श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीहेरंजगदाधारमरविंदाक्षमक्षरं ॥ अभिवंद्यात्मविज्ञानोपदेशवि
धिरुच्यते ॥ १ ॥ जयजयाजोचंद्रमौळी ॥ मातेंकृपादृष्टीन्याहाळीं ॥ मगपावेननव्हाळी ॥
ब्रह्मसुखाची ॥ २ ॥ तूंनिर्गुणनिर्विकार ॥ निःसंगुनिराकार ॥ तुझीयास्वरूपाचापार ॥ नेणती
ब्रह्मादिक ॥ ३ ॥ तूंब्रह्मरसाचापुतळा ॥ कींविश्वाचाजिव्हाळा ॥ जोसुखाच्यासुकाळा ॥
परमपुरुषा ॥ ४ ॥ तूंसच्चिदानंदतनु ॥ षड्भावविकारविहीनु ॥ स्वप्रकाशेंप्रकाशभानु ॥
स्वसंवेद्यु ॥ ५ ॥ तुझाअनुग्रहोघडे ॥ तरीचमातेंज्ञानहोयरोकडें ॥ स्वस्वरूपअनुभविजेपुढें ॥
स्वानुभव ॥ ६ ॥ तरीमाझेहृदयींवसावें ॥ प्रत्यक्षवाचेतेंचेतवावें ॥ जोस्वरूपबोलवावें ॥
मजकरवीं ॥ ७ ॥ तूंचतुर्विधवाचेतें ॥ प्रसवलासोनिरुतें ॥ ऐसेंजाणोनिजोतुमतें ॥ प्रार्थितअसें ॥
॥ ८ ॥ तुझेनिस्वरूपानुभवें ॥ म्यांकांनिवांतबसावें ॥ परोपकारार्थबोलावें ॥ हेतुझीइच्छा ॥
॥ ९ ॥ घालेपणाचेढेंकर ॥ जेंविदेताजेवणार ॥ तैसेतुझियास्वरूपाचेउद्गार ॥ बोलविसोमज
करवीं ॥ १० ॥ याबोबडियाबोला ॥ श्रीचंद्रचूडसंतोषला ॥ मगसौरसुपींदिधला ॥ ग्रंथ
निर्माणीं ॥ ११ ॥ वेदशास्त्राचामथितार्थु ॥ मराठाहाहोयफलितार्थु ॥ तरीचतुरींपरमार्थु ॥
कांनघ्यावा ॥ १२ ॥ चाडचातुर्यातेंजिणें ॥ ऐसेंबोलताशाहाणे ॥ तरीयेथेंचियेपरमार्थखुणे ॥

ग्राहिककांनव्हावें ॥ १३ ॥ जरीरुईचेझाडीं ॥ भरतीमवाचिकावडी ॥ तरीहिंडावयाचीआवडी ॥
कांपडोंद्यावी ॥ १४ ॥ जरीहेअरुषबोल ॥ तरीशेकडेंब्रह्मज्ञानहेंनवल ॥ तरीअवज्ञाकोणकरील ॥
येथविषयीं ॥ १५ ॥ उसकीरदिसेकाळा ॥ परीघेंपैंरसाचागळाला ॥ तैसेअरुषबोलपरीझळाळा ॥
दिसेविवेकाचा ॥ १६ ॥ नवरसांचीउपलवण ॥ तेउघडवाचेसीनागवण ॥ ह्मणोनिनप्रवर्त
तीशाहाणे ॥ तेथींच्याविषयीं ॥ १७ ॥ होयवक्तानवरसांचा ॥ जरीचतुरअपाडाचा ॥ तथा
पिलाभपरमार्थाचा ॥ तयादुर्लभकीं ॥ १८ ॥ तैसीमायीकरसवृत्ती ॥ बोलतांअंगासीनयेमहंती ॥
आणिपरमार्थसंविती ॥ तेदुरीदुरावे ॥ १९ ॥ श्वपचाचियावरींचापाकू ॥ झालाआपाडेंर
सिकू ॥ तथापिसदाचारलोकू ॥ तयानातळतीकीं ॥ २० ॥ तैसेंसंसारिकेंबोलणें ॥ जैंनरुवी
कारितीशाहाणे ॥ तयाअखंडअनुभवणें ॥ परमतत्व ॥ २१ ॥ जेथेंब्रह्मरसाचीगोडी ॥ अखं
डअनुभविजेफुडी ॥ त्याबोलाचीआवडी ॥ साधुजनासी ॥ २२ ॥ ह्मणोनिविवेकसिंधुनावें ॥
ग्रंथकीजेलशुद्धभावें ॥ तयाअवधानकरावें ॥ ह्मणेमुकुंदराजु ॥ २३ ॥ गुरुशिष्याचेनिसंवादें ॥
जैंबोलिजेलविनोदें ॥ तैंआईकआनंदें ॥ महानुभाव ॥ २४ ॥ कल्पतरूचेनिपाडें ॥ जरीफळती
घरचींझाडें ॥ तरीतियेआवडीचेनिकोडें ॥ नलावाविकां ॥ २५ ॥ देशोहोमन्हाटी ॥ परीउप

निषदांचीचराहटी ॥ तरीहाअर्थुजिवाचियागांठीं ॥ कांनबांधावा ॥ २६ ॥ आईतेशिष्याचे
आक्षेप ॥ सिद्धचिगुरुवाक्यदीप ॥ जेणेंसंशयतमाचेविक्षेप ॥ फिटतीश्रोतियाचे ॥ २७ ॥
हाग्रंथूविचारितां ॥ नाहींज्ञानाचोदुर्लभता ॥ आणिमुक्तीसायोज्यता ॥ बोधेंचिओळंघे ॥
॥ २८ ॥ याचदेहींआपुलेडोळां ॥ जंवनभोगिजेमुक्तीचासोहळा ॥ तरीवैराग्याच्यातातवेळां ॥
कांशिणावें ॥ २९ ॥ देहपातानंतरें ॥ मुक्तीपाविजेलयेउत्तरें ॥ साचमानावींचतुरें ॥ काय
ह्मणोनी ॥ ३० ॥ मरणानंतरेंमुक्ती ॥ येथविषयींकवणउपपत्ती ॥ ऐसाआक्षेपींपायसेविती ॥
निजगुरूचे ॥ ३१ ॥ स्थूलदेहनिमेल ॥ मागुतीमनुष्यदेहपाविजेल ॥ यावाक्याविश्वासेल ॥
ऐसाकवणअसे ॥ ३२ ॥ खंडज्ञानउपदेशती ॥ मोक्षउधारेंबोलती ॥ त्याच्याशुकोझकविती ॥
तेहीनाविवेकी ॥ ३३ ॥ ऐशियाचेनिउपदेशें ॥ कैसेनिसंसारनिरसे ॥ ह्मणोनीवायांचिवा
यवसे ॥ नानामतें ॥ ३४ ॥ आपुलीयाज्ञानदृष्टी ॥ अपरोक्षवस्तुसीनाहींभेटी ॥ त्यावे
डियाच्यागोष्टी ॥ कायकाज ॥ ३५ ॥ ह्मणोनीसद्गुरूचींपाउलें ॥ जेंहींसाचारपणेंधरिलें ॥
तेचिपैलपारपावले ॥ भवसागराच्या ॥ ३६ ॥ सद्गुरूचींलक्षणें ॥ बोलतीवेदशास्त्रेंपुराणें ॥
तींजाणोनियांशाहाणे ॥ अनुसरती ॥ ३७ ॥ जेसंसारासीवेगळे ॥ ज्ञानवैराग्येंआगळे ॥ ब्रह्म

रसस्वादाआनंदले ॥ तेसद्गुरूजाणावे ॥ ३८ ॥ कामक्रोधाचेनिविटाळें ॥ जयाचेंचित्तनामळे ॥
त्यानिरंतरसोहळे ॥ ब्रह्मसुखाचे ॥ ३९ ॥ विषयसुखाचेडोहळे ॥ मनींनुपजतीकवणेवेळे ॥
जयाचेंचित्तनुचंबळे ॥ हर्षविषादीं ॥ ४० ॥ ब्रह्मादिपिपीलिकांतीं ॥ सकळभूतजाती ॥ जयाची
चित्तवृत्ती ॥ नधरीविषमभावातें ॥ ४१ ॥ अपपरहेंकडसणी ॥ आणीकनाहींखोडीकवणी ॥
प्रपंचाचियाविणावणी ॥ नांदेपरमार्थूचि ॥ ४२ ॥ जेब्रह्मानंदेंडुल्लती ॥ करूनकांहींचनकरिती ॥
जेदुराग्रहीनव्हती ॥ कवणेविषयीं ॥ ४३ ॥ करितीसत्कर्मेंकोडें ॥ परीस्वस्वरूपस्थितीनमोडे ॥
जयास्वानंदुओसंडे ॥ सर्वेंइंद्रियद्वारें ॥ ४४ ॥ विधिनिषेधातेंकरिती ॥ परीविधिनिषेधेंनालिं
पती ॥ असुळविसुळनहोती ॥ ब्रह्मसंवितीस्फुरेह्मणोनी ॥ ४५ ॥ त्यजितअसतांनाहींत्यागू ॥
भोगितअसतांनाहींभोगू ॥ नवलहाज्ञानयोगू ॥ जेथेंनांदतसे ॥ ४६ ॥ निपजतीइन्द्रियांचे
व्यापारू ॥ परीअकर्तृत्वींचतुरू ॥ ब्रह्मविद्यादातांउदारू ॥ जेअतिपाडाचे ॥ ४७ ॥ जेअवस्था
त्रयींअगाध ॥ जयासीअखंडस्वरूपावबोध ॥ तेअमूर्तपरमानंद ॥ येणेंआकारें ॥ ४८ ॥ निमि
षोन्मेषाचाव्यापारू ॥ ज्यासीकरितांशिणथोरू ॥ तेयोगींद्रजाणावेसद्गुरू ॥ कैवल्यदानी ॥
॥ ४९ ॥ जेअंतरींचनिवाले ॥ आठवितांहीभागले ॥ विसराहीविसरले ॥ स्वस्वरूपजे ॥

॥ ५० ॥ इहींलक्षणींअलंकृत ॥ जेदेखिचेतिमहंत ॥ तेचिसद्गुरुजाणावेनिश्चित ॥ ईश्वरीअव
तार ॥ ५१ ॥ सांगितलेविशेषगुण ॥ हेंसद्गुरुचेंलक्षण ॥ आतांशिष्याचेंपरीक्षण ॥ निरूपि
जेल ॥ ५२ ॥ नव्हावाआळसीनिष्ठुर ॥ आणिस्वकार्यतत्पर ॥ गुरुद्रोहविषयींकातर ॥ तो
शिष्यनकरावा ॥ ५३ ॥ जारणमारणविध्वंसन ॥ स्तंभनमोहनवशीकरण ॥ उच्चाटणहेसप्त
विधलक्षण ॥ करतीतेशिष्यत्यजावे ॥ ५४ ॥ जेविषयरसींआसक्त ॥ अथवाअहंकारेंगर्वित ॥
ज्यासिपाखांडाचीसंगत ॥ तेशिष्यनकरावे ॥ ५५ ॥ जोनिंदकूनास्तिकू ॥ ज्ञानचोरछुंबकू ॥
विनाकाजेंवीणवादकू ॥ तोहीशिष्यवर्जिजे ॥ ५६ ॥ प्रगटावयाआपुलीमहंती ॥ सभेमाजी
गुरूतेंआक्षेपिती ॥ युक्तीखुंटलियाबळासियेती ॥ तेहीशिष्यत्यजावे ॥ ५७ ॥ जेदुस्तीप्राकृ
तदृष्टी ॥ गुरुसीकरितीतोंडपिटी ॥ ब्रह्मविद्येचीगोष्टी ॥ त्यांसीकायसी ॥ ५८ ॥ नव्हतांअंतः
करणशुद्धी ॥ जरीप्रयोजिजेआत्मबुद्धी ॥ तरीतयासीनाहींज्ञानसिद्धी ॥ अपरोक्षजे ॥ ५९ ॥
जेसंसाराचेनिराळे ॥ ज्ञानवैराग्याचेनिबळें ॥ सर्वदोषासीवेगळे ॥ तेसच्छिष्यजाणावे ॥ ६० ॥
जेशुद्धअंतःकरणींविरक्त ॥ सत्यवादीदृढव्रत ॥ निस्सीमगुरुभक्त ॥ अनन्यभावीं ॥ ६१ ॥ जे
वित्तशाठ्यनकरिती ॥ अपणातेंहीनवंचिती ॥ आणीकपरदैवतनेणती ॥ श्रीगुरुवांचुनी ॥ ६२ ॥

जेउदारमनाचे ॥ साचारभावाचे ॥ वांटेकरमुक्तीचे ॥ तेसच्छिष्यजाणावे ॥ ६३ ॥ यासानु रागाशिष्यातें ॥ स्वीकारावेंश्रीगुरुनाथें ॥ ज्ञानउपदेशवीनिरुतें ॥ पात्रभूता ॥ ६४ ॥ तेब्रह्म रसाचीमूस ॥ ज्ञानरत्नांचीमांदुस ॥ गुरूसीउपजेभडस ॥ उपदेशाविषयीं ॥ ६५ ॥ परिसाचे निसन्निधानें ॥ अष्टधातुहोयसोनें ॥ तैसेंशिष्यासीब्रह्महोणें ॥ तत्क्षणीं ॥ ६६ ॥ तेथेंगुरूशीं नलगेसायासु ॥ करितांज्ञानउपदेशु ॥ आत्मास्वयंप्रकाशु ॥ तयातत्क्षणेंची ॥ ६७ ॥ असं तशिष्यबोलिले ॥ तेहीजरीमुमुक्षुझाले ॥ तरीतेहीह्मणावेआपुले ॥ श्रीगुरुनाथें ॥ ६८ ॥ मंत्रा दिसाधनेंउपदेशें ॥ अष्टांगयोगयोगाभ्यासें ॥ चित्तनिर्मळहोयआपैसें ॥ तयाचेंही ॥ ६९ ॥ नातरीगुरुदास्यकरितां ॥ जळतीचित्तमैलसर्वथा ॥ होयज्ञानप्राप्तीत्वरिता ॥ श्रीगुरूचेनिप्रसादें ॥ ॥ ७० ॥ अष्टधातुपरिसींलागले ॥ तेतत्क्षणींकनकझाले ॥ अष्टधातुह्मणोनिसांडिले ॥ पाषाण जात ॥ ७१ ॥ तेहीजरीचूर्णकीजे ॥ अग्निसंगेंलोहनिपजे ॥ तेणेंहीसुवर्णहोइजे ॥ परिसस न्निधीं ॥ ७२ ॥ तैसेंवैराग्यवन्हीतापले ॥ ज्ञानाधिकारापातले ॥ अष्टधातुहीब्रह्मजाहले ॥ गुरुचरणप्रसादें ॥ ७३ ॥ गुरूचेंपहातांमहिमान ॥ परिसदिसेठेंगण ॥ तालोहातेंकरीसुवर्ण ॥ परीतोपरीसनव्हे ॥ ७४ ॥ परिसासन्निधवेंघलें ॥ लोहसुवर्णहोवोनिराहिलें ॥ तेथेंअन्यलोह

लागलें ॥ तेंकनकनव्हे ॥ ७५ ॥ तैसानव्हेगुरुकृपेचाबोधू ॥ जोसद्यस्वरूपावबोधू ॥ शिष्य
चिद्ब्रह्महोयहाविनोदू ॥ नवलतेथिंचा ॥ ७६ ॥ कल्पतरूचीउपमाद्यावी ॥ तोकल्पिलिया
अर्थातेंपुरवी ॥ कल्पनातीतभेटवी ॥ श्रीगुरुनाथ ॥ ७७ ॥ जननीआणिजनकें ॥ तियेंसंसार
दायिकें ॥ परीनव्हेतिभवबंधछेदकें ॥ श्रीगुरुवांचोनी ॥ ७८ ॥ कामधेनुआणिचिंतामणी ॥
इहींपुरवूंनसकतीऐणी ॥ चिंतिलियाअर्थाचीदानी ॥ ह्मणोनियां ॥ ७९ ॥ जोचिंतनासीअ
चिंत्य ॥ सकळकल्पनेविरहित ॥ तेंब्रह्मनिजानंदभरित ॥ हेदेताश्रीगुरुनाथ ॥ ८० ॥ ह्मणोनि
श्रीगुरूसीउपमा ॥ द्यावीऐसीकवणासीअसेमहिमा ॥ प्रपंचहोयपरब्रह्मा ॥ प्रसादेंजयाचेनी ॥
॥ ८१ ॥ परोपकाराचेनिसंतोषें ॥ पात्रकुपात्रऐसेंनोळखे ॥ गुरुमेघसर्वत्रवरुखे ॥ उदारपणें ॥
॥ ८२ ॥ तथापिपात्रताविशेषें ॥ स्थिरहोयसखोलभूमिके ॥ थेंबुनराहेउटंके ॥ जायनिरसोनी ॥
॥ ८३ ॥ तैसेंपात्रतेवीण ॥ स्थिरूंनशकेब्रह्मज्ञान ॥ येथेंजोदृष्टांतसांगेन ॥ तोअवधारिजे ॥
॥ ८४ ॥ जैसेंपुत्रविटाळले ॥ तेंपितृधनासीमुकले ॥ शुद्धझालियाभागपावले ॥ जयापरी ॥
॥ ८५ ॥ तैसेंनिजजनकईश्वराचें ॥ यासीब्रह्मचिधन साचें ॥ शुद्धजीवविभागीयेथींचें ॥ तदंश
ह्मणोनी ॥ ८६ ॥ जननाजनकें ॥ तियेंसंसारदायकें ॥ नव्हेतिबंधविच्छेदकें ॥ श्रीगुरुवांचोनी

॥ ८७ ॥ चित्तासीपडेविषयसंगू ॥ तंवजीवासीकैंचाज्ञानधनभागू ॥ ह्मणोनिआह्मीहाप्रसंगू ॥
आदरिला ॥ ८८ ॥ शिष्याचेंगुणदोषलक्षण ॥ संक्षेपेंकेलेंकथन ॥ आतांकीजेलअनुसंधान ॥
पुढलियाकथेचें ॥ ८९ ॥ शिष्यतापत्रयींसंतप्त ॥ शमदमादिसाधनसंयुक्त ॥ गुरूतेंशरणागत ॥
विनवीतसे ॥ ९० ॥ जीमीसंसारसागरींबुडालों ॥ तापत्रयवडवाग्नीनेंपोळलों ॥ क्रोधादिजळचरीं
विसंचलों ॥ झालोंमीअतिअशौच ॥ ९१ ॥ तरीज्ञानाच्यातारुविंबैसउनी ॥ कृपेचासुवायुपेलुनी
॥ देवेंचितारकहोउनी ॥ तारावेंमातें ॥ ९२ ॥ भवरोगमध्यान्हतातेवेळे ॥ तापलोंतापत्रयदावा
नळें ॥ जोकृपाजळधराज्ञानजळें ॥ निववावेंमातें ॥ ९३ ॥ संसाराचियाबंदिशाळे ॥ बांधलों
अज्ञानशृंखळें ॥ तेंबंधनतोडावेंस्वामिसळें ॥ ज्ञानशस्त्रेंकरूनी ॥ ९४ ॥ ऐसीकृपाउजवुनी ॥
विनवीशिष्यशिरोमणी ॥ मस्तकश्रीगुरूच्याचरणीं ॥ न्यासिताझाला ॥ ९५ ॥ तंवबोलिला
श्रीगुरुराजा ॥ बारेतूंशिणलासीकवणकाजा ॥ कैसेंधनतोडिजेलवोजा ॥ पाहेंपांरीकडेची ॥
॥ ९६ ॥ ऐसीप्रतिज्ञास्विकारून ॥ शिष्यातेंसन्मुखबैसऊनी ॥ आज्ञासमावेशकरूनी ॥ गुरुसं
प्रदायक्रमें ॥ ९७ ॥ तेथेंज्ञानशक्तीचाप्रवेशु ॥ अज्ञानशक्तीचानिरासु ॥ बोधउठिलास्वयंप्र
काशु ॥ शिष्यचैतन्यीं ॥ ९८ ॥ तेवेळींकंपस्वेदादिक ॥ उठिलेभावसात्विक ॥ जैसेंसाम्राज्या

तेंपावेरंक ॥ तैसेंवर्ततेंजाहलें ॥ ९९ ॥ यानांवशक्तिपातबोलिजे ॥ स्वानुभवेंअनुभविजे ॥ तेथें
निःशेषविसरिजे ॥ संसारस्मरणादिकहें ॥ १०० ॥ तंवआनंदाचापुरु ॥ आलाशिष्यसरिते
सिथोरु ॥ तेथेंअविवेकपव्हाणारु ॥ बुडोनिजाय ॥ १ ॥ अहंकारद्रुमउन्मळिला ॥ तृष्णापक्षि
णीचाकुरठामोडिला ॥ इन्द्रियग्रामबुडाला ॥ तियेआनंदजळीं ॥ २ ॥ ऐशियासुखाचेशेजारीं॥
तेथेंस्वानुभूतीअंतुरी ॥ तियाआलंगिलासुंदरी ॥ तोयोगिराजु ॥ ३ ॥ तियेचेनिअंगसंगें ॥
तुटतीविषयाचेडोहळे ॥ तेथेंअसिजेकेवळें ॥ स्वस्वरूपीं ॥ ४ ॥ स्वरूपसुखाचेनिभरें ॥ जेथेंकांहीं
चनस्मरे ॥ तेयोगनिद्रानसंचरे ॥ तयायोगिराजासी ॥ ५ ॥ तेथेंनेणोवनाजाणीव ॥ सरलेभा
वाभाव ॥ तेथेंएकछत्रीराणीव ॥ राजयोगाची ॥ ६ ॥ सर्वसुखाचीकुरोंडि ॥ जयासीवोवाळू
निसांडिजेफुडी ॥ तयाब्रह्मसुखाचीगोडी ॥ केंविबोलावी ॥ ७ ॥ जेथेंमनाचेंजाणणें ॥ खुंटलें
वाचेचेंबोलणें ॥ हेंज्याचेंतोचिजाणे ॥ येरांटकमकाचि ॥ ८ ॥ तैसेंपरमात्मयाचेनिआधारें ॥
इन्द्रियग्रामव्यापारें ॥ परीत्याचेनिवेव्हारें ॥ नालिंपिजेतो ॥ ९ ॥ ऐसाराजयोगसंकेतु ॥ पात
लातोअवधूतु ॥ यावरीलक्षतांतु ॥ तोअवधारिजे ॥ १० ॥ जेंमनावाचेअगोचरु ॥ तें

बोलतांसांकडेंथोरू ॥ तथापिऐकेंतूंचतुरू ॥ श्रीमुकुंदह्मणे ॥ ११ ॥ इतिश्रीमद्विवेकसिंधुस्तुति
क्रमेगुरुशिष्यसंवादेस्वरूपसमावेशोनामप्रथमप्रकरणम् ॥ १ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ ५ ॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ तंवसखीस्वानुभूतीची ॥ तुर्यापातलीनिजाची ॥ तियाप्रबोधेंलाहेज्या
ची ॥ तोयोगिराज ॥ १ ॥ झालेंनेत्रांचेंउन्मीलन ॥ उठिलेंअंतःकरण ॥ परीअनुभवाचेंअवतरण॥
तेनवचेचि ॥ २ ॥ इंद्रियेंकीरंरचियेलीं ॥ परीतयांचीधांवमोडिली ॥ पुनरपिबुचकळलीं ॥ तयेआनं
दजळीं ॥ ३ ॥ जैसेंभागलेंढोर ॥ पावेसुखाडिकविढार ॥ तेथूनिउठवितांथोर ॥ अंगचिघाली
॥ ४ ॥ तैसींतापत्रयेंतापलीं ॥ इन्द्रियेंब्रह्मानंदेंनिवालीं ॥ स्वविषयींप्रवर्तलीं ॥ नवप्रवर्ततीच
॥ ५ ॥ मगशिष्यवाडवेळ ॥ लाहूनिइन्द्रियांचेंबळ ॥ गुरूतेवाचाचरळ ॥ विनवीतअसे ॥ ६ ॥उ
ठिलाआनंदभरित ॥ गुरूसिप्रदक्षिणाकरित ॥ चरणावरीमस्तकठेवित ॥ वेळोवेळां ॥ ७ ॥ मनप्रे
मरसेंभरलें ॥ दोन्हीकरसंपुटजोडिले ॥ मगकांहींएकबोलणेंआरंभिलें ॥ शिष्यराजें ॥८॥ जयजया
जीअनाथबंधु ॥ जयजयाजीकरुणासिंधु ॥ तुमचामहिमाप्रसिद्धु ॥ राजयोगिया ॥ ९ ॥ जेंअना ॥ ५ ॥
दिहारवलें ॥ मीमजचिहोतेंचोरिलें ॥ तेंमातेंभेटविलें ॥ श्रीगुरुरायें ॥ १० ॥ तुझियाकृपादृष्टीं ॥
झालोमजअपरोक्षवस्तूसीभेटी ॥ उपमानाहींसृष्टीं ॥ तयामहासुखाची ॥ ११ ॥ तुझियाउपका

रा ॥ उत्तोर्णनव्हेगादातारा ॥ अर्पिजेतिसंभूतिसंभारा ॥ नानावस्तु ॥ १२ ॥ ब्रह्मकाळत्रयीं
अबाधित ॥ नानावस्तूत्यानाशिवंत ॥ तेणेंहोयउत्तीर्णत्व ॥ ऐसेंकेविंघडे ॥ १३ ॥ एकोंदिधला
कल्पतरू ॥ तयासीदिजेदर्पणींचाहारू ॥ तेणेंतोकायगव्हारू ॥ उत्तीर्णहोईल ॥ १४ ॥ चिंता
मणीचियासाठीं ॥ देइजेफुटकीकाचवटी ॥ तयाउत्तीर्णपणाच्यागोष्टी ॥ कायकरूंयेतिल
॥ १५ ॥ अहंतेचेंकाबिरें ॥ जयाचियादृष्टीउतरे ॥ तयासद्गुरूसीउत्तीर्णचतुरें ॥ कैसेंहोइजे
॥ १६ ॥ पशूसीसिंहाभिधान ॥ रंकासीराणेपण ॥ जीवासीशिवपण गुरूचेनिप्रसादें ॥ १७ ॥
ह्मणोनितनुमनधन ॥ गुरूसीकोजेसमर्पण ॥ तरीचहोइजेउत्तीर्ण ॥ कांहींएक ॥ १८ ॥ अ
होभक्तिभावगुरुवर्या ॥ हेंनेणोनिजोप्राणिया ॥ गुरूसीनभजेतोक्षणिया ॥ जायअधोगती ॥
१९ ॥ नाशिवंतहेउपचार ॥ गुरूसीवंचितीजेनर ॥ पाहुणेहोतीअविचार ॥ रौरवाचे ॥ २० ॥
आतांअसोहेमाझीअविद्या ॥ हेळाचिफेडिलीसद्या ॥ जीभवरोगवैद्या ॥ श्रीगुरुराया ॥ २१ ॥
भवरोगेंमोवेष्टिलों ॥ देहप्रमाणेंरोडेलों ॥ तोतुवांउपचारिलों ॥ निकियापरी ॥ २२ ॥ अर्ध
मात्राब्रह्मरसें ॥ मातेंउपचारिलेंकैसें ॥ ब्रह्मगोळकोंदतूअसे ॥ माझेनिपुष्टपणें ॥ २३ ॥ क
वणास्काचियामरणा ॥ आडघालितीसाधुजना ॥ तयाचियाउपकाराउत्तीर्णा ॥ तेणेंकेंविहो

इजे ॥ २४ ॥ जन्ममरणाचियाकोडी ॥ सुकतीजयाचियाप्रौढी ॥ तयागुरुदास्याचीगोडी ॥
अनुपम्यकीं ॥ २५ ॥ गुरुकृपेचेंफळलेंपण ॥ हेंचितेथींचीजाणाखूण ॥ जेंनितनवेंप्रेमलक्षण ॥
गुरुदास्याविषयीं ॥ २६ ॥ मंत्रयंत्रादिउपदेशिते ॥ गुरुघरोघरींअसतीआइते ॥ परीसंसारमहा
दुःखातें ॥ फेडूंनशकती ॥ २७ ॥ ह्मणोनिदुर्लभश्रीगुरु ॥ जोपरब्रह्मींसिकरीसाक्षात्कारु ॥ जया
चियेदृष्टिहेलाचिसंसारु ॥ निरसोनिजाय ॥ २८ ॥ आतांकैवल्याचादानी ॥ तूंचिएकत्रिभु
वनीं ॥ संसारदैन्यजयाचेनी ॥ दूरीघडीहोय ॥ २९ ॥ संसारदुःखविसरलों ॥ मीमहासुखें
निवालों ॥ तुमचाअनुग्रहपावलों ॥ ह्मणोनीजी ॥ ३० ॥ आतांराउळेंएकसेंकरावें ॥ तेंसुख
मागुतेंमजव्हावें ॥ तेंचिहोवोनिअसावें ॥ म्यांनिरंतर ॥ ३१ ॥ तेंसुखकिमात्मक ॥ कैसेंजा
णावेंम्यांसम्यक ॥ तरीजीकृपापूर्वक ॥ मजनिरूपावें ॥ ३२ ॥ ऐसीप्रार्थनाऐकोन ॥ श्रीगुरु
तोचिकामधेन ॥ दुभेवोरसेदाटून ॥ शिष्यवत्सासी ॥ ३३ ॥ मगतोकायबोलिलायोगींद्रु ॥
बारेतूंपूर्णचंद्रु ॥ तुवांमाझाबोधसमुद्रु ॥ कैसाउल्हासविलासी ॥ ३४ ॥ तुझियागुणगणनेसी ॥
उपमानाहींकोणासी ॥ तरीबोलिजेलतेंनिजमानसीं ॥ दृढधरावें ॥ ३५ ॥ तुजमहासुखलाधलें ॥
जेंगुरुदास्यफळलें ॥ जेंअनुभवासीआलें ॥ परब्रह्म ॥ ३६ ॥ जेथेंमनासीनाहींसौरस्य ॥ वाचेसीनाहीं

प्रवेशू ॥ तोभेटलास्वयंप्रकाशू ॥ ब्रह्मानंदू ॥ ३७ ॥ जेंस्थूलनारोड ॥ ठेंगणेंनावाड ॥ तें
महासुखगोड ॥ ईश्वरस्वरूप ॥ ३८ ॥ जेंपरब्रह्मअखंड ॥ बोलतांवेदासिकुवाड ॥ तेंअनुभ
वितांहोयकाबाड ॥ विषयसुखपैं ॥ ३९ ॥ जेथेंनिद्रानाजागणें ॥ करणेंनाभोगणें ॥ तयासु
खाचोचाखणें ॥ आपणची ॥ ४० ॥ मीतूंहेंकडसणी ॥ जेथेंनाहींकाळींकवणीं ॥ तियेपरम
निर्वाणीं ॥ लीनझालासीतूं ॥ ४१ ॥ कल्पनेचेंआभाळ ॥ जेथेंविरालेंएकवेळ ॥ तेंचिदाकाश
निर्मळ ॥ तुजप्रकाशलें ॥ ४२ ॥ हेंमहावाक्याचेंरहस्य ॥ जेंजीवेश्वरांचेंसामरस्य ॥ जेणें
उपजेवैरस्य ॥ संसारसुखाचें ॥ ४३ ॥ हाचिशिवशक्तीचासमयोगू ॥ यातेंचबोलिजेराज
योगू ॥ जेणेंफिटेभवरोगू ॥ हेळामात्रें ॥ ४४ ॥ हेनिर्विकल्पसमाधी ॥ भवरोगादिव्यऔ
षधी ॥ जेणेंतुटेआधिव्याधी ॥ विषयाचीपैं ॥ ४५ ॥ हाचितुजअलभ्यलाभजाहला ॥ जो
परमात्माभेटला ॥ क्षणएकसुकाळझाला ॥ महासुखाचा ॥ ४६ ॥ ऐसीहेब्रह्मस्थिती ॥ येथें
मजव्हावीदृढमती ॥ ऐसीतुझीचित्तवृत्ती ॥ तरीअवधारीजे ॥ ४७ ॥ येविषयींअसेउपावो ॥
जेणेंहोयस्वरूपींसद्भावो ॥ तोचिधरींयेरूसांडींवावो ॥ मिथ्याभ्रमू ॥ ४८ ॥ व्हावीविषयीं
विरक्ती ॥ चित्तासीप्रत्यक्वृत्ती ॥ करावीईश्वरभक्ती ॥ अनन्यभावें ॥ ४९ ॥ जोश्रीगुरूचाअनु

ग्रहीत ॥ तेणेंसेवावाएकांत ॥ तेथेंचिंतावागुणातीत ॥ परमपुरुष ॥ ५० ॥ जेजेवृत्तीउठी ॥
तेतेंदेखिजेवेगळालीदिठी ॥ तरीकल्पनाहिंपुटी ॥ होऊनिमुरे ॥ ५१ ॥ मनासरिसेंधांवतां ॥
नतुटेसंसारव्यथा ॥ तेणेंसिवेगळेंहोतां ॥ महासुख ॥ ५२ ॥ जोजोविषयआठवेल ॥ तोतो
मिथ्यात्वेंविदारिजेल ॥ तरीसहजचिउपजेल ॥ सुलीनता ॥ ५३ ॥ ह्मणोनिजोसंकल्पउठी ॥
नवजावेंतयापाठीं ॥ वळावीमागुतीदृष्टी ॥ निरालंबीं ॥ ५४ ॥ तेनिरालंबनिर्गुण ॥ जिवाचें
जन्मस्थान ॥ ह्मणूनिव्हावेंलीन ॥ तेथेंचिपैं ॥ ५५ ॥ मीब्रह्मयेणेंआकारें ॥ ब्रह्मरूपस्फुर्ती
स्फुरे ॥ तेंविचारितांतत्वनिर्धारें ॥ उठेनिरालंबीं ॥ ५६ ॥ आपुलियेजन्मभूमिके ॥ वस्तीबहु
पुण्यठाके ॥ तेथेंनिमिजेतरीचुके ॥ अधःपतन ॥ ५७ ॥ देहाचेजन्मभूमिकेचें ॥ एवढेंमहिमा
नसाचें ॥ तरीजन्मस्थानजीवाचें ॥ तेंअगाधमहिमानकीं ॥ ५८ ॥ नद्याउगमींस्थिरावती ॥
तरीतेचिसमुद्रहोती ॥ आधारकांनव्हती ॥ आणिकानदीसी ॥ ५९ ॥ तैसाआपुलाउगवू ॥
जरीनसोडिताहाजीवू ॥ तरीअंगासियेताथोरावू ॥ ब्रह्मपणाचा ॥ ६० ॥ ह्मणूनिकल्पनेसी
मारू ॥ करावाइंद्रियांचासंहारू ॥ तरीजीवब्रह्मासीसिनारू ॥ कैंचाउरे ॥ ६१ ॥ अनुभवाची
एकखुण ॥ जेणेंप्रपंचासीहोयसंहरण ॥ तेथींचोविवंचनासांगेन ॥ तेऐकपातूं ॥ ६२ ॥ स्वरू

पोन्मुखस्फुरण ॥ हेंमायेचेंलक्षण ॥ अविद्यातेजाण ॥ विपरीतकल्पना ॥ ६३ ॥ मनचक्षु
रादिकें ॥ इन्द्रियेंहींअनेकें ॥ तींसुखदुःखेंदायकें ॥ अविद्याजनीतें ॥ ६४ ॥ ह्मणूनिकल्प
नेच्याग्रासीं ॥ नासेमायाअविद्येसी ॥ तेथेंसंहारइंद्रियांसी ॥ आपैसेंहोय ॥ ६५ ॥ जैसेंपाणी
चोराच्याद्वारीं ॥ वरीलरंध्रदाटिजेजरी ॥ थेंबेंमोकळेंचपरी ॥ धरावेनलगती ॥ ६६ ॥ तैसी
कल्पनाविराली ॥ तेथेंसंसृतीनिमाली ॥ येथेंआक्षेपींस्फुरली ॥ मजयुक्तीएक ॥ ६७ ॥ सुषु
प्तीअवस्थेकल्पना ॥ निःशेषहोयलीना ॥ तरीजीवाचीसंसारणा ॥ कांनचुकेची ॥ ६८ ॥ ऐशा
आक्षेपींउत्तर ॥ बोलिजेलसुंदर ॥ तेंऐकतूंचतुर ॥ जेणेंसंदेहफिटे ॥ ६९ ॥ जीवासीसुषुप्ती
दशे ॥ कल्पनाकीरनसे ॥ परीअज्ञानननिरसे ॥ तेणेंसंसृतीहोय ॥ ७० ॥ सुषुप्तींआत्मनेणिजे ॥
तैसेंचिहोऊनिअसिजे ॥ तेथेंचिस्वानुभवबोलिजे ॥ कवणेपरी ॥ ७१ ॥ आत्माविषयींअज्ञान ॥
जंववरीनव्हेक्षीण ॥ तंवनचुकेजन्ममरण ॥ जीवासीपैं ॥ ७२ ॥ श्रीगुरुचेनिकृपाभरें ॥ फिटे
अज्ञानसुररे ॥ मगसच्चिदानंदउरे ॥ परब्रह्मतें ॥ ७३ ॥ सुषुप्तिकाळींकल्पना ॥ अज्ञानामाजीं
होयलीना ॥ तेणेंअज्ञानेंहीजाणा ॥ वर्तेआत्मयासी ॥ ७४ ॥ तेथेंअज्ञाननमरे ॥ ह्मणूनिसं
सारनसरे ॥ तरीआक्षेपाचींउत्तरें ॥ निरर्थकचीं ॥ ७५ ॥ जीवांवृक्षजाती ॥ निरंतरवर्तेसुषुप्ती ॥

तेथेंकल्पनेसीवस्ती ॥ अज्ञानगर्भीं ॥ ७६ ॥ अनुभवाचीखुणा ॥ तेअनारिसीजाणा ॥ तेथें
अज्ञानसहितकल्पना ॥ विरेस्वरूपीं ॥ ७७ ॥ श्रीगुरूचेउपदेशें ॥ अज्ञानमरेआपैसें ॥ तेथें
परब्रह्मप्रकाशे ॥ कल्पनातीत ॥ ७८ ॥ अनुभवाचियाभूमिका ॥ चारीगाशिष्यटिळका ॥
सांगिजेतीत्याऐका ॥ एकाग्रहोउनी ॥ ७९ ॥ प्रथमजाणविक्षेपता ॥ दुसरीतेगतायाता ॥
तिसरीतेसंश्लिष्टता ॥ चौथीसुलीनताप्राप्तदशेची ॥ ८० ॥ करितांब्रह्माभ्यासू ॥ चित्तासीहो
यस्वरूपींसौरसू ॥ तेंसांडूनिकरीहव्यासू ॥ सांसारीक ॥ ८१ ॥ मगसावधहोइजे ॥ चित्तासी
मागुतीवळविजे ॥ ब्रह्माभ्यासकीजे ॥ तेविक्षिप्तापैं ॥ ८२ ॥ गतायातातेऐसी ॥ चित्तस्वरूपीं
समरसी ॥ तेथूनिउठेपरीअपैसी ॥ बैसेस्वरूपीं ॥ ८३ ॥ मनस्वरूपींलाविजे ॥ तेणेंतेथेंचिअ
सिजे ॥ आनंदेंफुंजोंलागिजे ॥ तेसंश्लिष्टतापैं ॥ ८४ ॥ ब्रह्मींचित्तनिःशेषमुरे ॥ केवळज्ञानी
चिउरे ॥ सुखाचाफुंजउतरे ॥ तेसुलीनदशा ॥ ८५ ॥ ऐसाब्रह्माभ्यासकरितां ॥ भूमिकाजाण
वतीसमस्ता ॥ मगअनायासेंतत्त्वता ॥ पावेयोगिराज ॥ ८६ ॥ अथवाइंद्रियेंकांमारावीं ॥
जेथेंधांवतीतेथेंचिधरावीं ॥ तरीसुलीनतापावावी ॥ शेकडीचो ॥ ८७ ॥ नातोंइंद्रियेंनातोंविष
यसुखें ॥ तेथेंकवणकवणातेंदेखे ॥ चित्तमुरेमगओळखे ॥ कवणकवणातें ॥ ८८ ॥ मंदमती

चियाआक्षेपा ॥ हाप्रस्तावसांगितलाबापा ॥ येरांसिकायसेपा ॥ सायासहो ॥ ८९ ॥ आतां
असोहाप्रसंगू ॥ तुजनिरोपिलाराजयोगू ॥ हेंस्मरेतोचांगू ॥ बहुतांमध्यें ॥ ९० ॥ निमिषो
न्मेषाचेंअर्ध ॥ चित्तस्वरूपींहोयसावध ॥ तरीपापराशीहोतीदग्ध ॥ क्षणमात्रें ॥ ९१ ॥ जैसें
स्वप्नींघडेदुरित ॥ तेंप्रबोधींहोयभस्मभूत ॥ तैसेंनिजबोधेंसमस्त ॥ पातकजळे ॥ ९२ ॥ चित्त
अवलंबनेंवीण ॥ जरीनराहेस्थिरपण ॥ तरीदेवाचेंसगुण ॥ स्वरूपचिंतावें ॥ ९३ ॥ तेथेंहृद
याच्याशेजारीं ॥ षोडशोपचारेंपूजाकरीं ॥ उपासावाश्रीहरी ॥ अनन्यभावें ॥ ९४ ॥ रजस्त
मींजैंमैळ ॥ तेंचित्तवेगेंहोयनिर्मळ ॥ मगनिर्गुणींभक्तीप्रबळ ॥ आपसयांहोय ॥ ९५ ॥ निर्गु
णींपरमपुरुषीं ॥ जीवाऐक्यहोयसेखीं ॥ तयेमहासुखीं ॥ समरसेतो ॥ ९६ ॥ नातरीअष्टांग
योगें ॥ कांभक्तिप्रसंगें ॥ जीवपरमात्मसंगें ॥ तदात्मतापावे ॥ ९७ ॥ तंवशिष्यविनविजे ॥
जीवशब्देंकायबोलिजे ॥ ब्रह्महेंनांवठेविजे ॥ कवणासीजी ॥ ९८ ॥ परमात्मातोकवण ॥ सगु
णकींनिर्गुण ॥ तोकैसाकिंलक्षण ॥ सांगावेंजी ॥ ९९ ॥ मायातेकवणशक्ती ॥ तियेसींकैसी
स्वरूपस्थिती ॥ अविद्येचीकैसीरीती ॥ किमाश्रयते ॥ १०० ॥ प्रपंचकवणेंनिर्मिला ॥ कास
याचाउभारला ॥ जिवासीसंसारनाथिला ॥ किंनिमित्तजी ॥ १०१ ॥ जीहेप्रश्ननिरूपावे ॥ माझे

मनोरथपुरवावे ॥ मातेंसर्वज्ञकरावें ॥ कृपानिधी ॥ २ ॥ ऐसीशिष्याचीविनंती ॥ ऐकोनिश्रीगुरु
कायबोलती ॥ श्रोतींअवधारावेंचित्तीं ॥ ह्मणेमुकुंदराज ॥ ३ ॥ इतिश्रीमद्विवेकसिंधौसृष्टिक्रमे
गुरुशिष्यसंवादेस्वानुभवाद्वितीयप्रकरणंनामद्वितीयप्रकरणंसमाप्तम् ॥ २ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥
श्रीगणेशायनमः ॥ ॥ ऐकेंशिष्यशिरोमणी ॥ धन्यधन्यतुझीवाणी ॥ आठवींयेथींच्याप्रश्नीं ॥
परमपुरुषतो ॥ १ ॥ स्वरूपांवरींनिर्गुणीं ॥ उमटतीजोवेश्वराच्याश्रेणी ॥ तेथींचीकरा
वीउपलवणी ॥ स्वानुभवेंकीं ॥ २ ॥ पाथरवटाचीटांकी ॥ जरीझालीतरीतोनिकी ॥ तथा
पिकरूंनयेमौक्तिकीं ॥ रंध्रशलाका ॥ ३ ॥ तैसादेशवळायुक्तो ॥ घेऊंनयेब्रह्मसंवित्तीं ॥ तेथेंवि
वेकाचीसंपत्ती ॥ निकोव्हावीलागे ॥ ४ ॥ म्हणूनिविवेकाचेकान ॥ करूनिएकनिरूपण ॥
अनुक्रमेंतुझेप्रश्न ॥ सांगिजेती ॥ ५ ॥ जेंशक्तिचक्रासीवेगळ ॥ जेंज्ञसिमात्रकेवळ ॥ तेंनिजानंद
निर्मळ ॥ परब्रह्मजाणावें ॥ ६ ॥ दृश्यद्रष्टादर्शन ॥ हेंत्रिपुटीजेथेंक्षीण ॥ तेंपरब्रह्मजाण ॥
अनिर्देश्य ॥७॥ ज्ञाताज्ञानज्ञेय ॥ हेंजेथेंनाहींत्रितय ॥ तेंपरब्रह्मअप्रमेय ॥ जाणावेंपैं ॥८॥ ज्ञान
ह्मणूंतरीनाहींजाणिव ॥ अज्ञानह्मणूंतरीनाहींनेणिव ॥ अभावह्मणूंतरीनवलठेव ॥ आनंदाची
॥ ९ ॥ अभावह्मणिजेतेंशून्य ॥ शून्यपादीयाचेंमततेंजघन्य ॥ ह्मणूनिजगींतेंचिगाधन्य ॥ब्रह्म

विदजे ॥ १० ॥ आहेह्मणूंतरीकैसेंनिध्यावें ॥ नाहींह्मणूंतरीकैसेंनिसांडावें ॥ असोहेंब्रह्मअ
नुभवावें ॥ जयाचेंतेणेंचि ॥ ११ ॥ जेंनिद्रिस्थातेंचेववी ॥ चेइलीयातेंजाणवी ॥ जाग
लीयातेंभोगवी ॥ परीअक्रियतें ॥ १२ ॥ स्फटिकशिळेचेंपोट ॥ जैसेंनिरंतरनिघोट ॥ तै
सेंचैतन्यएकदाट ॥ परब्रह्मतें ॥ १३ ॥ नातरीगगनाऐसेंपोकळ ॥ व्यापकपरीव्याप्यासि
वेगळ ॥ निजप्रकाशेंसोज्वळ ॥ आपणपैंची ॥ १४ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ करितांशि
णतीनिजव्यापार ॥ मगसेवितीविश्राममंदिर ॥ परब्रम्हतें ॥ १५ ॥ जेथेंविद्यानाअविद्या
॥ जेंअनुपम्यस्वसंविद्या ॥ तें जाणावेंसुविद्या ॥ ब्रह्मस्वरूपतूं ॥ १६ ॥ झालापांसवें
श्वरू ॥ धरिलाजाणिवेचाअहंकारू ॥ तरीतोहीनेणेपारू ॥ तयास्वरूपाचा ॥ १७ ॥ ह्म
णूनिअहंकारगळे ॥ आणिकल्पनामावळे ॥ तरीचब्रह्मआकळे ॥ स्वानुभवासी ॥ १८ ॥
ब्रह्मगोळकाचेंसहस्र ॥ व्यापूनिसबाह्यांतर ॥ आसकेंचिउरलेंनिरंतर ॥ ब्रह्मस्वरूपजें ॥
॥ १९ ॥ गगनींनाथिलेंआभाळ ॥ तैसेंब्रह्मींमायापडळ ॥ तेंविरालियाकेवळ ॥ ब्रह्मचि
असे ॥ २० ॥ ब्रह्मादिकसकळें ॥ रजस्वलाव्यालीढिसाळें ॥ तियामायादेवींसीनातळे ॥
परब्रह्मतें ॥ २१ ॥ तेंध्यानेंवीणध्यायिजे ॥ चिंतनेवीणाचिंतिजे ॥ जाणणेंविणजाणिजे ॥

परब्रह्मतें ॥ २२ ॥ हेंपरब्रह्मनिर्गुण ॥ सर्वेश्वराचेंनिजस्वरूपजाण ॥ मूळमायेसीअधिष्ठान
॥ पूर्णचैतन्यजें ॥ २३ ॥ मायाब्रह्मींचाविवर्त ॥ ऐसेंबोलेवेदांतसिद्धांत ॥ जोउपनिषदां
चामथितार्थ ॥ प्रमाणसिद्ध ॥ २४ ॥ वेदविरुद्धमत ॥ तेंपाखंडजाणनिश्चित ॥ ह्मणो
निसांडींतेअपसिद्धांत ॥ विवर्तएक ॥ २५ ॥ ब्रह्मनिर्विकारजैसें ॥ तैसेंअसतांचिअसे ॥ ते
थेंअन्यथाआभासभासे ॥ तोतद्विवर्तगा ॥ २६ ॥ निजाकारेंविचरत ॥ रविप्रकाशेंअसेवर्तत ॥
तेथेंजळाभासभासत ॥ तोतद्विवर्तजैसा ॥ २७ ॥ नातरीजैसादोरु ॥ तेथिंचा न मोडे आकारु ॥
नाहींतोचिआभासेथोरु ॥ महासर्पजैसा ॥ २८ ॥ ब्रह्मतेंउपमारहित ॥ तेथेंकायसेंपांदृष्टांत ॥
परीएकदेशीहोयउचित ॥ बुझावयाउद्देश ॥ २९ ॥ असोआदिब्रह्मींचाविवर्त ॥ तेथेंगुणसाम्य
ऐसासंकेत ॥ अनुवादेसांख्यसिद्धांत ॥ अतिचतुरजो ॥ ३० ॥ हेगुणत्रयाचीसाम्यता ॥
ईश्वराचीउन्मनीअवस्था ॥ तेंचिचैतन्यअधिष्ठिता ॥ बोलिजेमहामाया ॥ ३१ ॥ महामा
येचेंलक्षण ॥ तेंशुद्धसत्वात्मकजाण ॥ स्वस्वरूपाचेंअनुसंधान ॥ परब्रह्मतें ॥ ३२ ॥ सत्व
गुणाचीक्षोभकदशा ॥ महामायायेणेंनावेंऐसा ॥ आभासेंमिथ्याभूतठसा ॥ तोब्रह्मविवर्तगा
॥ ३३ ॥ मीब्रह्मयेणेंआकारें ॥ ज्ञानरूपस्फूर्तीस्फुरे ॥ तीओळखावीचतुरें ॥ महामाया ॥३४॥

ब्रह्मजैसेंपरिपूर्ण ॥ तदाकारेंस्फुरण ॥ तयेमायेसीमर्यादाकवण ॥ करीलबापें ॥ ३५ ॥ मायेची
दुर्घटता ॥ तेंचिहेजाणावीजाणता ॥ जेकेवळभासेतद्वता ॥ नाथिलीची ॥ ३६ ॥ ह्मणूनिदुर्घट
त्वहेंभूषण ॥ मायेसीनव्हेदूषण ॥ तीब्रह्मींअसेघटमान ॥ तरीमायानव्हेती ॥ ३७ ॥ हेंनघडते
ठायींघडे ॥ मगदाखवीआपुलेपवाडे ॥ जेभोजेंनाचवीकोडें ॥ ब्रह्मादिकांतें ॥ ३८ ॥ सृष्ट्यादि
व्यापार ॥ जोकरीजगदीश्वर ॥ तोहीमायेचाबडिवार ॥ ऐसाजाणतूं ॥ ३९ ॥ हेंअसंभवनीय
॥ मायाअनिर्वचनीय ॥ मिथ्याचपारिवाय ॥ आभासतसे ॥ ४० ॥ तूंऐसेंह्मणसी ॥ मायाअ
निर्वचनीयकैसी ॥ तरीउत्तरार्थीबुझसी ॥ अनायासें ॥ ४१ ॥ अहोब्रह्मआपणातें ॥ मी
ब्रह्मऐसेंनह्मणतें ॥ तरीब्रह्मींचेंकायउणेंहोतें ॥ ब्रह्मपणगा ॥ ४२ ॥ ह्मणूनिमिथ्याभूतमा
या ॥ विश्वमायामयजाणूनियां ॥ तरीब्रह्मतेंअद्वया ॥ कांनह्मणावें ॥ ४३ ॥ जेंमिथ्या
त्वेंकार्यअसे ॥ साचसारखेंआभासे ॥ गगनींगंधर्वनगरजैसें ॥ नाथिलेंची ॥ ४४ ॥ ऐसी
मायाउठिली ॥ तेपरब्रह्मींअधिष्ठिली ॥ तेप्रकृतीबोलिली ॥ सांख्यमतें ॥ ४५ ॥ हेमा
यामूळप्रकृती ॥ परमपुरुषाचीनिजशक्ती ॥ तियेसीतेणेंसीसंगती ॥ तेंअवधारीजो ॥ ४६ ॥
घंटजोजोंनिपजे ॥ तोतोआधींचगगनेंव्यापिजे ॥ तैसेंजेंजेंतत्वनिपजे ॥ तेंतेंव्यापिजेचैतन्यें

॥ ४७ ॥ नातरीउठतियातरंगातें ॥ जळआधींचव्यापूनिवर्तें ॥ तैसेस्फूर्तीयेमायेतें ॥ व्यापिलेंपरब्रह्में ॥ ४८ ॥ जेणेंमायेतेंव्यापिलें ॥ तेंसगुणब्रह्मबोलिलें ॥ येरजेंअशेषउरलें ॥ केवळब्रह्म ॥ ४९ ॥ जेणेंमायाअधिष्ठिजे ॥ तेंब्रह्ममायोपाधिकबोलिजे ॥ मायाशबलऐसेंह्मणिजे ॥ तयेतेंचिगा ॥ ५० ॥ तेंब्रह्मसगुण ॥ तोचिपरमात्माजाण ॥ परमपुरुषऐसीखूण ॥ तेथेंचिबोलिजे ॥ ५१ ॥ परमपुरुषाचेंलक्षण ॥ तेंमूळप्रकृतीसीभिन्न ॥ हेंकिजेलकथन ॥ तेंऐकपांतूं ॥ ५२ ॥ मूळप्रकृतीआंतू ॥ पुरुषसाक्षित्वेंअसेवर्ततू ॥ तियेतेंजाणतूं ॥ निजप्रकाशें ॥ ५३ ॥ तैसाभासतोनिराभास ॥ तेंप्रकाश्यतोस्वप्रकाश ॥ तथापिअनादिसर्वांस ॥ तयांप्रकृतिपुरुषांसी ॥ ५४ ॥ तेंवेद्यतोवेत्ता ॥ तेंज्ञेयतोज्ञाता ॥ परीनवलअभिन्नता ॥ तयादोघांची ॥ ५५ ॥ पुरुषप्रकृतितेजाणे ॥ आपुलेनिसर्वज्ञपणें ॥ तियेसीनेणवेपरिसणें ॥ तेणेंपुरुषेंसी ॥ ५६ ॥ हाअनादिसिद्धरोळू ॥ जोप्रकृतोपुरुषांचामेळू ॥ एकावीणएकासीवेळू ॥ नफिटेक्षणभरी ॥ ५७ ॥ वर्णव्यक्तीरहितें ॥ प्रकृतोपुरुषेंदोघेंअमूर्तें ॥ त्यांचियास्वरूपनिर्धारातें ॥ जाणस्वानुभवें ॥ ५८ ॥ हापुरुषपरमात्मा ॥ स्वयंज्योतीविज्ञानात्मा ॥ येणेंअनुगृहीतजीवात्मा ॥ जोजाणेपुरुषातें ॥ ५९ ॥ प्रकृतीचेनिदृश्यपणें ॥

दृष्टयापुरुषालागेजाणणें ॥ अनुभवीयोयाखुणें ॥ जाणेलगा ॥ ६० ॥ हाज्ञाननिग्रहोपरमेश्वर ॥
सर्वात्मानिर्विकार ॥ तयास्वरूपाचाविसर ॥ कदाचिनाहीं ॥ ६१ ॥ प्रवृत्तिनिवृत्तिमायेची ॥
करावयासमर्थहाची ॥ तेथेंहरिहरब्रह्मादिकांची ॥ मातकायसी ॥ ६२ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥
हेश्रीप्रभूचेअवतार ॥ तथापितेआज्ञाधार ॥ तयापरेशाचे ॥ ६३ ॥ मायेचेगुणत्रय ॥ तेंब्रह्मा
दिदेवत्रय ॥ करितीसृष्टयादिककार्य ॥ आज्ञेश्रीपतीचिया ॥ ६४ ॥ आणीकयांचाव्यापार ॥
करावयाससमर्थनव्हेइतर ॥ ह्मणूनिगोसावीसर्वेश्वर ॥ ब्रह्मादिकांसी ॥ ६५ ॥ अहोसमस्त
मायेतें ॥ सगुणब्रह्मचेष्टतें ॥ ह्मणूनिसर्वेश्वरआणिकातें ॥ ह्मणूंचिनये ॥ ६६ ॥ तेणेंसर्वेश्वरें
अवलोकिली ॥ मायामहत्तत्वातेंव्याली ॥ सृष्टीव्हावयाचीइच्छाझाली ॥ तेंमहत्तत्वगा ॥ ६७ ॥
जेंमायेचेंशुद्धत्व ॥ तेंचिओतींवमहत्तत्व ॥ जेथरजतमाचेंगूढत्व ॥ वर्तेसत्वगर्भी ॥ ६८ ॥
हेगुणक्षोभिणीमाया ॥ देवाचेंकारणदेहजिया ॥ घडविलेंमहाप्रळया ॥ रुद्राकरवीं ॥ ६९ ॥
तेसर्वेश्वरेंअधिष्ठित ॥ त्रिविधअहंकाराप्रसवत ॥ मायागुणींचेष्टित ॥ प्रकटली ॥ ७० ॥
सात्विकराजसतामस ॥ त्रिविधअहंकारजाणजस ॥ तेथेंशक्तित्रयाचाविकास ॥ दिसेअनुक्रमें
॥ ७१ ॥ सात्विकअहंकारींज्ञानशक्ती ॥ राजसींवर्तेक्रियाशक्ती ॥ तामसींअसेद्रव्यशक्ती ॥

निरंतरपैं ॥ ७२ ॥ सर्वैश्वरूअवलोकित ॥ द्रव्यशक्तीसमवेत ॥ तामसअहंकारप्रसवत्त ॥
पंचमहाभूतें ॥ ७३ ॥ तामसअहंकारगगनातें ॥ गगनेंव्यापिलेंपवनातें ॥ तोपवनदहनातें ॥
प्रसवताझाला ॥ ७४ ॥ दहनव्यापिलाउदकातें ॥ उदकव्यापिलेंपृथ्वीतें ॥ यापरीपंचमहाभूतें ॥
जनितीझालीं ॥ ७५ ॥ शब्दविषयगगनीं ॥ स्पर्शविषयपवनीं ॥ रूपसारेंदहनीं ॥ विशेषगुण
॥ ७६ ॥ आपाचाविषयरस ॥ पृथ्वीचागंधजाणजस ॥ कार्यकारणभावेंप्रवेश ॥ दिसेअन्य
गुणांचा ॥ ७७ ॥ तंवचैतन्यनाथअधिष्ठित ॥ क्रियाशक्तिसमायुक्त ॥ राजसअहंकारप्रसवत ॥
पंचदशतत्वें ॥ ७८ ॥ व्यानउदानसमान ॥ प्राणआणिअपान ॥ एवंपंचदशतत्वांचागुण ॥
एकत्रसंभूत ॥ ७९ ॥ श्रोत्रत्वक्चक्षुजिव्हाघ्राण ॥ हेंज्ञानेंद्रियपंचकजाण ॥ कर्मेंद्रियपंचक
सांगेन ॥ तेंऐकपांतूं ॥ ८० ॥ वाचापाणीपाद ॥ चौथेंशिश्नपांचवेंगुद ॥ हेंकर्मेंद्रियपंचकशुद्ध ॥
तुजनिरूपिलें ॥ ८१ ॥ मगसात्विकअहंकारें ॥ ज्ञानशक्तीचेसहकारें ॥ अंतःकरणपंचकबारे ॥
जन्मलेंकैसें ॥ ८२ ॥ एकचिअंतःकरण ॥ चतुर्धाभेदेंभिन्न ॥ मनबुद्धीचित्तअहंकारजाण ॥
येणेंचिन्यायें ॥ ८३ ॥ सात्विकअहंकारतत्वेंजनिलीं ॥ तींभोगसाधनेंबोलिलीं ॥ कर्ताभोक्ता
ह्मणितलीं ॥ तत्वविदीं ॥ ८४ ॥ राजसअहंकारतत्वजनित ॥ श्रोत्रादित्वचेचासंघात ॥

तोसाधनशब्दैंविख्यात ॥ सकलविषयीं ॥ ८५ ॥ तामसअहंकाराचीसृष्टी ॥ तेभोग्यसाम्य
ऐसीगोष्टी ॥ कार्यभोग्यहेपरिपाठी ॥ तेथेंविवर्तीं ॥ ८६ ॥ एवंअहंकारेंत्रिविधें ॥ तत्वेंजालीं
त्रिविधें ॥ तियेंत्रिपुटीयेणेंशब्दें ॥ बोलिजेती ॥ ८७ ॥ ज्ञाताज्ञानज्ञेय ॥ भोक्ताभोगणेंभोग्य ॥
कर्ताकारणकार्य ॥ ऐसीहेत्रिपुटी ॥ ८८ ॥ अंतःकरणभोक्ता ॥ इंद्रियांसीभोगसाधनता ॥
पंचभूतांसीभोग्यता ॥ विषयरूपत्वें ॥ ८९ ॥ एकैकभोक्तासाधक ॥ तिहींसाधनांचामेळापंचक ॥
करूनिप्रवेशलानिःशंक ॥ एकैकभूतीं ॥ ९० ॥ त्यांपरस्परानुप्रवेश ॥ सांगिजेलतेंऐकजस ॥
ऐकूनिधरीजस ॥ निजमानसीं ॥ ९१ ॥ अंतःकरणव्यानाधारें ॥ श्रोत्रइंद्रियाचेनिद्वारें ॥
वाचासहितसंचरे ॥ शब्दगुणआकाशीं ॥ ९२ ॥ मनसमानाचेनियोगें ॥ त्वचेंद्रियाचेनिभोगें ॥
पाणींद्रियसहितरिघे ॥ स्पर्शगुणपवनीं ॥ ९३ ॥ बुद्धिउदानाचेनिबडिवारें ॥ चक्षुइंद्रियांचे
निआधारें ॥ पादेंद्रियसहितबारे ॥ रूपगुणातेजीं ॥ ९४ ॥ चित्तप्राणाचेनिबळें ॥ जिव्हेंद्रियाचे
निमेळें ॥ शिश्नसहितमिळे ॥ रसगुणआपीं ॥ ९५ ॥ अहंकारअपानीवसे ॥ घ्राणाचेनिसहवासें ॥
वायुसहितप्रवेशे ॥ गंधगुणपृथ्वीसी ॥ ९६ ॥ एवंविषयरूपभूतांसी ॥ चारीचारीमिळालेएकासी ॥
पांचांचींपंचवीसऐसीं ॥ जाहलींमहाभूतें ॥ ९७ ॥ पंचविषयपंचभूतें ॥ तियेंतामसाहंकार

जनितें ॥ म्हणोनितत्वेंसमस्तें ॥ मिळालींतेथेंचिपैं ॥ ९८ ॥ होतीअतिसूक्ष्मअव्यक्तें ॥ जींपंच
महाभूतें ॥ तींपावलींस्पष्टदशेतें ॥ परस्परानुमेळें ॥ ९९ ॥ एवंपरस्परानुप्रवेश ॥ जेतत्वेंसी
पंचधासहवास ॥ हाईश्वरइच्छामायाविकाश ॥ विस्तार झाला ॥ १०० ॥ याप्रसंगानंतरें ॥
श्रीमुकुंदमुनीचेंदातारें ॥ प्रपंचविस्तारिलासर्वेश्वरें ॥ कैसातोअवधारिजे ॥ १०१ ॥ इतिश्री
मद्विवेकसिंधौसृष्टिक्रमेगुरुशिष्यसंवादेतत्वसृष्टिकथनंनामतृतीयप्रकरणंसमाप्तम् ॥ ३ ॥
श्रीगणेशायनमः ॥ ॥ मगश्रीपरमपुरुषें ॥ आपुलेनिइच्छावशें ॥ द्विधाकेलींअशेषें ॥ तियेंपं
चमहाभूतें ॥ १ ॥ यामध्येंएकाभागाचा ॥ तयांपंचविसांकळांचा ॥ लिंगदेहसर्वेश्वराचा ॥
आरंभिताझाला ॥ २ ॥ जींतत्वेंपंचवीस ॥ तींहिरण्यगर्भाचेअंश ॥ लिंगशरीरसाभास ॥ एक
देवाचें ॥ ३ ॥श्रोत्रदिशात्वचापावन ॥ चक्षुसूर्यजिव्हावरुण ॥ अश्विनौदेवतेंघ्राण ॥ हिरण्य
गर्भाचें ॥ ४ ॥ वाचावन्हीपाणीसुरपती ॥ पादवामनशिश्नप्रजापती ॥ गुदेंद्रियतोनैर्ऋती ॥
प्रसिद्धजाणावा ॥ ५ ॥ जयांब्रह्मांडींविहरण ॥ तेचिप्रसिद्धपंचप्राण ॥ दशधाभेदेंभिन्न ॥ सप्त
चक्रेंसप्तस्कंधजे ॥ ६ प्रथमजाणावाआवस्कंध ॥ वायुभूमीपासूनप्रसिद्ध ॥ मेघपर्यंतस्वतः
सिद्ध ॥ ओळखावा ॥ ७ ॥ प्रवस्कंधदुसरा ॥ मेघापासूनअवधारा ॥ सूर्यापर्यंतखरा ॥

व्यापूनीअसे ॥ ८ ॥ तिसराउद्वस्कंध ॥ सूर्यापासूनिविशद ॥ चंद्रमापर्यंतभेद ॥ ओळ
खावा ॥ ९ ॥ सहस्कंधचवथा ॥ चंद्रमंडळापासोनितत्वतां ॥ नक्षत्रपर्यंतपाहतां ॥ विस्तार
लाजो ॥ १० ॥ विवस्कंधपांचवा ॥ नक्षत्रापासूनिजाणावा ॥ शनीपर्यंतबरवा ॥ वि
स्तारलाजो ॥ ११ ॥ षष्ठमपरास्कंध ॥ शनिपासूनित्याचावेध ॥ सप्तऋषीपर्यंतभेद ॥ प्र
सिद्धजाणावा ॥ १२ ॥ परीवाहस्कंधसातवा ॥ सप्तऋषीपासूनिध्रुवावा ॥ ध्रुवपर्यंतजा
णावा ॥ मिळोनिअसे ॥ १३ ॥ अंतःकरणतोविष्णु ॥ चंद्रमातोमन ॥ बुद्धीकमलासन ॥
हिरण्यगर्भाची ॥ १४ ॥ चित्ततोनारायण ॥ अहंकारगौरीरमण ॥ एवंपंचवीसतत्वांचागुण ॥
लिंगदेहप्रभूचा ॥ १५ ॥ हेंसूक्ष्मभूतांचेंदळवाडें ॥ लिंगदेहईश्वराचेंपुढें ॥ तथापिविषयसुख
नातुडे ॥ स्थूळदेहाविण ॥ १६ ॥ तयास्थूळदेहाचेंनिर्माण ॥ नाहींपंचीकृतभूतांविण ॥ म्हणू
निभूतांचेंपंचीकरण ॥ देवेंआरंभिलें ॥ १७ ॥ एकैकभूतपंचधाकीजे ॥ पांचहीपांचांठायींमेळ
विजे ॥ हापंचीकृतप्रकारबोलिजे ॥ वेदांतशास्त्रीं ॥ १८ ॥ तोपंचीकृतप्रकार ॥ करिताझाला
जगदीश्वर ॥ तेथींचासांगिजेलनिर्धार ॥ तोएकजतूं ॥ १९ ॥ सर्वेश्वरेंअवलोकिलें ॥ गगन
पंचधाविभागिलें ॥ तेंअंतःकरणरूपेंराहिलें ॥ आपणपैंचि ॥ २० ॥ त्यानांशेंवायूसीं ॥ श्रोत्रां

शेंतेजासीं ॥ वाचाआपींशब्दपृथ्वीसीं ॥ गगनमिळतेंझालें ॥ २१ ॥ पवनमनोरूपें ॥ आका
शींसमर्पे ॥ समानांशेंआपणपें ॥ अधिष्ठिताझाला ॥ २२ ॥ त्वचांशेंपावकीं ॥ पाणींद्रियें
उदकीं ॥ स्पर्शांशेंपृथ्वीयेसिकीं ॥ वायुमिळताझाला ॥ २३ ॥ तेजबुध्याकारें ॥ आकाशीं
संचरे ॥ पवनींप्रवेशेबारे ॥ उदानरूपें ॥ २४ ॥ चक्षुरूपराहिलेंआपणपां ॥ पादेंद्रियमिळालें
आपा ॥ रूपांशेंपृथ्वीसिपां ॥ तेजमिळतेंझालें ॥ २५ ॥ उदकचित्तांशें ॥ आकाशींप्रवेशे ॥
पवनींसमरसे ॥ प्राणरूपें ॥ २६ ॥ जिव्हांशेंतेजासी ॥ आपणपांस्थिरावलेंशिश्नेंसी ॥ रसांशें
पृथ्वीसी ॥ आपमिळतेंझालें ॥ २७ ॥ अहंकारेंधरणी ॥ प्रवेशलीगगनीं ॥ अपानरूपेंपवनीं ॥
मिळतीझाली ॥ २८ ॥ घ्राणेंद्रियेंतेजासीमिळालीं ॥ गुदेंद्रियेंआपणासींप्रवेशली ॥ गंधरूपें
निजस्थानींराहिली ॥ धरित्रीहे ॥ २९ ॥ यापरीपंचीकृतें ॥ स्थूलपंचमहाभूतें ॥ गुणकर्मधर्म
सहितें ॥ निजपतींझालीं ॥ ३० ॥ कवणभूताचेकवण ॥ कर्मधर्मगुण ॥ तेसांगेनविवंचून ॥
ऐकपांतूं ॥ ३१ ॥ सच्छिद्रताहाधर्म ॥ अवकाशप्रदानकर्म ॥ शब्दगुणबूझवर्म ॥ आकाशींचें
॥ ३२ ॥ शब्दस्पर्शहेगुण ॥ चांचल्यताहाधर्मजाण ॥ वहनादिककर्मकरण ॥ वायूचेंपैं ॥
॥ ३३ ॥ शब्दस्पर्शरूप ॥ हेतेजींगुणत्रयाचाआरोप ॥ उष्णत्वहाधर्मदेख ॥ कर्मपचनादिक ॥

॥ ३४ ॥ शब्दस्पर्शरूपरस ॥ आपींहेगुणसमरस ॥ द्रव्यत्वधर्मबहुवस ॥ कूदनादिक ॥ ३५ ॥
शब्दस्पर्शरसरूपगंध ॥ हेगुणपृथ्वीचेप्रसिद्ध ॥ कठिणत्वधर्मकर्मस्वतःसिद्ध ॥ धारणादिक ॥
॥ ३६ ॥ कारणभूतांचेगुण ॥ कार्यानुरूपवर्ततीजाण ॥ जैसेंजळींचेंसाद्रपण ॥ वर्ततरंगासवें ॥
॥ ३७ ॥ एकैकभूतींएकएक ॥ विशेषगुणमुख्यनायक ॥ अन्यभूतांचेआगंतुक ॥ वर्ततीकार
णत्वें ॥ ३८ ॥ शब्दगुणअसेआकाशीं ॥ ह्मणूनिवेधश्रोत्रेंद्रियासी ॥ गगनापासूनिजन्मवा
यूसी ॥ ह्मणूनिद्विगुणतो ॥ ३९ ॥ शब्दस्पर्शगुणवायूसी ॥ ह्मणोनिवेधश्रोत्रत्वचेसी ॥ वायू
पासावजन्मतेजासी ॥ ह्मणूनित्रिगुणतें ॥ ४० ॥ शब्दस्पर्शरूपहेगुणतेजासी ॥ ह्मणूनिवेध
श्रोत्रत्वचाचक्षूसी ॥ तेजापासावजन्मआपासी ॥ तेचतुर्गुणगा ॥ ४१ ॥ शब्दस्पर्शरूपरस
हेगुण ॥ आपासीह्मणूनिदृश्यपण ॥ श्रोत्रत्वचाचक्षुजिव्हाजाण ॥ जळासिगा ॥ ४२ ॥ उदका
पासूनिजन्मली ॥ ह्मणूनिगुणपंचकेंआथिली ॥ इन्द्रियपंचकासीवेधझाली ॥ धरित्रीहे ॥ ४३ ॥
आपुलेंनिइच्छामात्रें ॥ पंचभूतेंविचित्रें ॥ कालवूनिरसतन्मात्रें ॥ कर्दमकेला ॥ ४४ ॥ असोहीं
स्थूळमहाभूतें ॥ सर्वेश्वरेंकेलींपंचीकृतें ॥ मगस्थूळदेहअनंतें ॥ निर्मिलाकैसा ॥ ४५ ॥ महा
तेजाचेनिप्रभावें ॥ कर्दमशोषिलास्वभावें ॥ मगनिर्मिलेंदेहभावें ॥ ब्रह्मांडहें ॥ ४६ ॥ देवता

मयलिंगदेह ॥ तयाचेंस्थूळशरीरगृह ॥ ह्मणूनिदेवेंअवयवसमूह ॥ रचिलेंब्रह्मांडहें ॥ ४७ ॥ सप्त
पाताळतेंचरण ॥ तेथेंत्रिविक्रमाचेंअधिष्ठान ॥ तेथींचीविवंचनासांगेन ॥ तेंऐकपांतूं ॥ ४८ ॥
सातवेंपाताळतेंतळ ॥ विराटपुरुषाचेंपादतळ ॥ प्रपदतेंरसातळ ॥ जाणावेंपैं ॥ ४९ ॥ गुल्फ
द्वयतेंमहातल ॥ पोटरियातलातल ॥ सुतलतेंजानुयुगुल ॥ विश्वरूपाचें ॥ ५० ॥ वितलआ
णिअतल ॥ हेंजाणावेंऊरुयुगुल ॥ कटिप्रदेशांतमहीतल ॥ ओळखावें ॥ ५१ ॥ तृणवृक्षगुल्म
लता ॥ त्यारोमावलीसमस्ता ॥ गंगादिनानासरिता ॥ त्यानाडिचक्रें ॥ ५२ ॥ सप्तहीसागर ॥
तेंदेवाचेंउदर ॥ तेथेंवडवानळतेंजठर ॥ वन्हीजाणावा ॥ ५३ ॥ नाभिस्थानतेंनभमंडळ ॥ ज्यो
तिर्लोकतेंवक्षस्थळ ॥ महर्लोककंठनाळ ॥ विराटाचें ॥ ५४ ॥ जनलोकतेंवदन ॥ तपोलोकतें
ललाटस्थान ॥ मस्तकब्रह्मभुवन ॥ सत्यलोकपैं ॥ ५५ ॥ इंद्रलोकतेहात ॥ इंद्रासोअधिष्ठान
जेथ ॥ दिशांचापोकळपंथ ॥ तोंकर्णरंध्रें ॥ ५६ ॥ तरणीचेंमंडळ ॥ तेंजाणावेंनेत्रयुगुळ ॥
तेथेंचक्षुरिंद्रियविशाळ ॥ सूर्यासारखें ॥ ५७ ॥ पुत्रकलत्रस्नेहदांत ॥ यमदाढाउद्धत ॥ वरुण
लोकविख्यात ॥ तेजिव्हाजाणावी ॥ ५८ ॥ प्रजापतीलोकतेंशिश्न ॥ निरयलोकगुदस्थान ॥
जलवृष्टीरेतजाण ॥ विराटपुरुषाचें ॥ ५९ ॥ एकाचिदेहामाझारीं ॥ जसीकुर्मीचीभरोवरी ॥

तेणेंसमस्तेंसीचतुरीं ॥ एकचीबोलिजे ॥ ६० ॥ तैशाचौऱ्यायशींलक्षयोनी ॥ असतीब्रह्मांड
भुवनीं ॥ तिहींसहितवेदपुराणीं ॥ ब्रह्मांडबोलिजे ॥ ६१ ॥ ऐसाब्रह्मांडगोल ॥ पंचभूतांचानि
खिल ॥ याभीतरींसकल ॥ जीवसमूह ॥ ६२ ॥ याभूगोलादशगुण ॥ बाह्यपृथ्वीचेंआवरण ॥
पृथ्वीसीदशगुणवेष्टून ॥ आवरणउदकाचें ॥ ६३ ॥ उदकादशोत्तर ॥ धडाडितवैश्वानर ॥
तयादशगुणसमीर ॥ आवरणगा ॥ ६४ ॥ तयादशगुणअधिक ॥ बाहेरीनभाचाकंचुक ॥ नभा
दशगुणकौतुक ॥ अहंकाराचें ॥ ६५ ॥ अहंकारदशगुण ॥ महत्तत्वाचेंपांघुरण ॥ ऐसेंहेंसप्ता
वरण ॥ ब्रह्मांडपैं ॥ ६६ ॥ जैसासप्तकंचुकपिंड ॥ तैसेंचिहेंब्रह्मांड ॥ ह्मणुनिउभयतांचेंकोड ॥
एकसारिखें ॥ ६७ ॥ ऐसीयाब्रह्मांडाच्याकोटी ॥ उपजतीमायादेवीच्यापोटीं ॥ असोहेतत्व
सृष्टीपरिपाठी ॥ तुजनिरूपलीहे ॥ ६८ ॥ हेंब्रह्मांडस्थूलशरीर ॥ श्रीप्रभूचागाविस्तार ॥
तेथेंसृष्टिरचनेचाउभार ॥ तेजागृतीअवस्था ॥ ६९ ॥ स्थूलदेहब्रह्मांड ॥ सृष्टीअवस्थाप्रचंड ॥
यादोहोंचाअभिमानीअखंड ॥ जोब्रह्मासृष्टिकर्ता ॥ ७० ॥ प्रणवाचीप्रथममात्रा ॥ अकाराक्ष
रजेपवित्रा ॥ आतांदोहींच्याचरित्रा ॥ बोलतसें ॥ ७१ ॥ हिरण्यगर्भाख्यलिंगदेह ॥ जेथेंहरी
अभिमानीहोय ॥ तेथेंस्थितीअवस्थानिःसंदेह ॥ स्वप्नबोलिजे ॥ ७२ ॥ हिरण्यगर्भस्थिती

अवस्था ॥ यादेहींचाअभिमानीभोक्ता ॥ जोविष्णुतासीबुडतां ॥ भवसागरीं ॥ ७३ ॥ यात्र
यातेंअसेबोलत ॥ प्रणवींचाउकारजोविख्यात ॥ द्वितीयमात्राऐसासंकेत ॥ तेथेंबोलिजे ॥ ७४ ॥
देवाचाकारणदेहप्रकृती ॥ जेथेंमहाप्रळयसुषुप्ति ॥ यादेहींचाअभिमानीगौरीपती ॥ तेथेंबोलिजे
॥ ७५ ॥ यातिहींचाउच्चार ॥ करीतृतीयमात्रामकार ॥ असोसकलहीओंकार ॥ विस्तारला ॥
॥ ७६ ॥ विराटहिरण्यगर्भमाय ॥ हेंसर्वेश्वराचेंदेहत्रय ॥ उत्पत्तिस्थितिप्रलय ॥ अवस्था
त्रयपैं ॥ ७७ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ हेअभिमानीसुरवर ॥ अकारउकारमकार ॥ मात्रात्रयहें ॥
॥ ७८ ॥ रजसत्वतमहेंगुणत्रय ॥ प्रणवाचेंपादत्रय ॥ असोहेउभवणीमायामय ॥ येणेंरचिली ॥
॥ ७९ ॥ हेकारणरूपउपाधी ॥ सर्वेश्वरींवर्तेत्रिशुद्धी ॥ केवळब्रह्मींविशुद्धी । तेआथीचिना ॥
॥ ८० ॥ हाकारणोपाधिमिश्रित ॥ निरूपिलाशबलतत्पदार्थ ॥ श्रीमुकुंदमुनीत्वंपदार्थ ॥
आतांसांगिजेल ॥ ८१ ॥ इतिश्रीमद्विवेकसिंधौसृष्टिक्रमेगुरुशिष्यसंवादेईश्वरतनुत्रयकथनंनाम
चतुर्थप्रकरणंसमाप्तम् ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥१६॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ तंवबोलिलाशिष्याचाराणा ॥ जीवईश्वरब्रह्मींचेंलक्षण ॥ राउळेंनिरू
पिलेंपूर्ण ॥ मजकृपाबुद्धी ॥ १ ॥ आतांजीवसृष्टीचीकथा ॥ सांगावीश्रीगुरुनाथा ॥ माझी

फिटेसंदेहव्यथा ॥ आत्मविषयींची ॥ २ ॥ ऐसीशिष्याचीविनवणी ॥ श्रीगुरुराजेंऐकूनी ॥
मगप्रेमभावेंआलिंगूनी ॥ बोलताझाला ॥ ३ ॥ बारेतुझेप्रश्नें ॥ झालेंसुखाचेंपारणें ॥ ऐक
सावधानपणें ॥ बोलिजेलजें ॥ ४ ॥ हागाआपुलाअलंकार ॥ चोखकरीजोसोनार ॥ तयाच्या
उपकार ॥ नविसरीजेपैं ॥ ५ ॥ तैसेंआपुलेंनिजसुख ॥ तुवांस्मरविलेंदेख ॥ जेंस्फुरलेंउन्मेख ॥
मजईश्वरविषयीं ॥ ६ ॥ घरोघरींरेटमकाहणी ॥ एकपुसेएकवाखाणी ॥ तयाब्रह्मसुखाची
शिराणी ॥ हतदैवांसकैंची ॥ ७ ॥ आत्मयाचेंपरिज्ञान ॥ हेंतत्पदार्थशोधन ॥ एतदर्थींसंन्या
सादिकसाधन ॥ श्रुतीबोलती ॥ ८ ॥ तत्पदार्थईश्वरेंवीण ॥ त्वंपदार्थानाहींवर्तन ॥ ह्मणूनि
पुनरपिकथन ॥ ऐकतत्पदींचें ॥ ९ ॥ जोपरमात्मामहाविष्णु ॥ आदिपुरुषभगवानु ॥ जोसच्चि
दानंदतनु ॥ पूर्वींनिरूपिला ॥ १० ॥ जोसर्वात्मासर्वसाक्षी ॥ सर्वेश्वरसर्वकुक्षी ॥ जोकांहींच
नुपेक्षी ॥ निजभक्तांतें ॥ ११ ॥ जोदेवअतिलाघवी ॥ नाहींतेंब्रह्मगोलदाखवी ॥ गेलेंह्मणोनी
लपवी ॥ जेथींचेंतेथें ॥ १२ ॥ जयासीकानावीणऐकणें ॥ डोळ्यावीणदेखणें ॥ जिव्हेवीण
चाखणें ॥ सर्वरसांतें ॥ १३ ॥ पायांवीणसर्वचालणें ॥ हातांवीणदेणेंघेणें ॥ तयाजीवांतेंउद्धारणें
इच्छामात्रें ॥ १४ ॥ जोजवळीचापरोअतिदुरी ॥ दूरस्थपरीजीवाभीतरी ॥ जयाचीसत्तानिज

व्यापारीं ॥ वर्तें इंद्रियग्राम ॥ १५ ॥ प्रतिग्रामीं अवभासक ॥ जैसा तरणी चेक ॥ तो सर्व जीवां
प्रकाशक ॥ परमात्मा चि एवं ॥ १६ ॥ तो चि शबल तत्पदार्थ ॥ ज्ञानविग्रह अमूर्त ॥ सर्वव्यापक
परी मूर्तिमंत ॥ भक्तांकारणें ॥ १७ ॥ नटनाट्य आचरिता ॥ आपण यातें न भुले सर्वथा ॥ तैसे नाना
अवतार घेतां ॥ न भुले स्वस्वरूप ॥ १८ ॥ सगुणरूप मायिक ॥ ऐसें मानूनि कांहीं एक ॥ जे न भजती
कौतुक ॥ ते मूढ जाणावे ॥ १९ ॥ सोंग संपादितां तोषलेपणें ॥ नटासी दीजती अलंकार भूषणें ॥
सोंग मिथ्या परि मानणें ॥ नटासीचि ॥ २० ॥ तैसें की मायिक अवतरण ॥ तेथें कीजे जें भजन ॥
तें होय समर्पण ॥ जगदीश्वरीं ॥ २१ ॥ म्हणूनि सर्वेश्वराचें भजन ॥ कांहीं च न व्हे अप्रमाण ॥ जें
भक्तासी कैवल्यसाधन ॥ ज्ञानद्वारें ॥ २२ ॥ श्रवणकीर्तनस्मरण ॥ पादसेवन अर्चन वंदन ॥
दास्य सख्य आत्मनिवेदन ॥ हे भक्ती नवविधा पैं ॥ २३ ॥ नवलक्षण भजनें ॥ सर्वेश्वर आभार
लेपणें ॥ ज्ञान देऊनि बंधनें ॥ तोडी निजसेवकांचीं ॥ २४ ॥ तो देव परमात्मा ॥ ब्रह्म होईना जी
वात्मा ॥ प्रपंच ठाईचा अनात्मा ॥ तो देव कैसेनि म्हणावा ॥ २५ ॥ ब्रह्म तो ईश्वर कां न म्हणावा ॥
ऐसा आक्षेप बोलें कावा ॥ तत्वतः अद्वैत परी जाणावा ॥ भेद औपाधिक ॥ २६ ॥ अहंताम्म
तापयत्नरहित ॥ इच्छादिशक्तिचक्रविवर्जित ॥ तें ब्रह्म तूं आधीं चित्तत्वतां ॥ ईश्वर कैसेनी गा ॥ २७ ॥

इच्छादिशक्तिचक्रासीनियंता ॥ जोसृष्टिस्थितिसंहारकरिता ॥ षड्गुणैश्वर्यांच्याअधिष्ठिता ॥ तो
ईश्वरजाणावा ॥ २८ ॥ जोअविद्याकामकर्मैंवेष्टित ॥ अज्ञानवशेंस्वरूपभुलत ॥ जोसुखदुःखें
व्याकुलित ॥ तोईश्वरकैसेनीगा ॥ २९ ॥ जीवासीतत्वज्ञानावीण ॥ नाहींभवबंधछेदन ॥ तीं
करावीसोडवण ॥ ईश्वरेंचिकीं ॥ ३० ॥ ब्रह्मतंवनिर्गुणनिराकार ॥ तेथेंनाहींउपदेशव्यवहार ॥
अविद्यकजीवअनीश्वर ॥ स्वयेंअज्ञानिये ॥ ३१ ॥ तरल्यानेंबुडतातारावा ॥ प्रबुद्धेंनिद्रितचेव
वावा ॥ तेंविनित्यमुक्तप्रभूनेंसोडवावा ॥ जीवसंघहा ॥ ३२ ॥ अविद्याकीजेंभ्रममिथ्या ॥ परीजीवा
पढियेसत्या ॥ जैसीस्वप्नींचीलटकीव्यवस्था ॥ परीनिद्रितासीसाचहोय ॥ ३३ ॥ अविद्याबंधन
साचहोतें ॥ तरीज्ञानाचेनिकांलोटतें ॥ देवासीथोरसायासपडते ॥ बंधनमोक्षाचे ॥ ३४ ॥ तेंचि
अज्ञानकैसें ॥ केवळनाहींतेचिआभासे ॥ शुद्धचैतन्यालाविलेंपिसें ॥ जीवदशेचें ॥ ३५ ॥
तयाअज्ञानाचीस्थिती ॥ जोओळखेगानिगुती ॥ तयातेंनबाधेहेसंसृती ॥ म्हणूनिएकतूं ॥
॥ ३६ ॥ जोशक्तिशकाचागोसावी ॥ सत्यसंकल्पमायावी ॥ अपारजीवसृष्टीहोवावी ॥ ऐसेंचि
तितताझाला ॥ ३७ ॥ प्रपंचानुसंधानकरितां ॥ किंचितस्वरूपींझालीदुश्चितता ॥ तेथेंउठिलिया
अनंता ॥ अज्ञानशक्ती ॥ ३८ ॥ स्वरूपींदुश्चितपण ॥ हेंचिअज्ञानाचेंलक्षण ॥ जेणेंचैतन्यासी

मरेअवतरण ॥ अहंतेचें ॥ ३९ ॥ अवयवहस्तपादादिक ॥ एकादेहाचेजैसेअनेक ॥ तैसेअज्ञा
नसंगेंअसंख्य ॥ अंशमायादेवीचे ॥ ४० ॥ एकाचबुद्धीच्याअनेकवृत्ती ॥ तेंवीमायेच्याअ
नेकशक्ती ॥ जाणिवेनेंणिवेच्याप्रतीती ॥ जगप्रसिद्धकीं ॥ ४१ ॥ मायादेवीचागोसावी ॥
ज्ञानशक्तीमायावी ॥ प्रविष्टझालायाजीवात्मभावीं ॥ तोचिबोलिजे ॥ ४२ ॥ जैसामुख्यएक
सविता ॥ प्रतिबिंबासीतरीअनेकता ॥ तैसीईश्वरींअसेअनेकद्वैतता ॥ उपाधिभेदें ॥ ४३ ॥
जेंवमुख्यसूर्यमंडल ॥ तेंअसेंनिश्चल ॥ प्रतिबिंबसूर्यतेंव्याकुल ॥ तरंगवशें ॥ ४४ ॥ तैसानि
त्यानंदभरित ॥ ईश्वरअसेवर्त्तत ॥ जीवसंगेंव्याकुलहोत ॥ अज्ञानवशें ॥ ४५ ॥ तळींचेंपाणी
असतचिअसे ॥ तदंशतरंगासीजन्ममरणदिसे ॥ तैसादेवपरीविनाशे ॥ जीवसंगेंहा ॥ ४६ ॥
तरंगाच्याजन्ममरणीं ॥ जेंविंनवेईजेपाणी ॥ तैसीजीवधर्मांचीघाणी ॥ ईश्वरींनलगे ॥ ४७ ॥
पाणीयासीकोजेवेगळें ॥ तरंगचिनाहींकवणयेकाळें ॥ परीतरंगधर्मतेजाळें ॥ त्यजिलेंचिकीं ॥
॥ ४८ ॥ तैसेंपरमात्म्याचियेसत्ते ॥ सकलजीवअसतीवर्तत ॥ परीजीवधर्मांकदांचित ॥
नवेईजेतो ॥ ४९ ॥ आतांअसोहेशब्दरचना ॥ चैतन्येंअधिष्ठितांअज्ञाना ॥ तत्क्षणींविपरीत
ज्ञाना ॥ तेथेंचिआभास ॥ ५० ॥ रज्जूविषयींजेंअज्ञान ॥ तयासीद्रष्टाचिअधिष्ठान ॥ सर्पा

कारेंविपरीतज्ञान ॥ उठिलेंतेथेंचिपैं ॥ ५१ ॥ ह्मणूनिअज्ञानअन्यथाज्ञान ॥ उभयासीचैतन्यअ
धिष्ठान ॥ जडवर्गासीस्वतंत्रपण ॥ तेठाईंचनाहीं ॥ ५२ ॥ रज्जूआपणातेंनेणें ॥ हींसर्पाकार
जाणणें ॥ ह्मणूनिअज्ञानअन्यथाज्ञानें ॥ अजडींआत्मरूपीं ॥ ५३ ॥ सूर्यरश्मीचेचमेघहोती ॥
तेसूर्यातेंचिआवरिती ॥ परीसूर्यातेंलोपवूंनशकती ॥ दिवसपणातें ॥ ५४ ॥ तैसेंआपुलिया
अधिष्ठानातें ॥ अज्ञानअरीआत्मयातें ॥ साक्षित्वलक्षणीप्रकाशातें ॥ कवणनिवारी ॥ ५५ ॥
आत्माआपणयातेंकीरनेणें ॥ परीसर्वातेंसाक्षित्वेंजाणे ॥ हेंनिवारावेंकवणें ॥ विचारींपां ॥
॥ ५६ ॥ अज्ञानअविद्याआवरिका ॥ विपरीतज्ञानविक्षेपिका ॥ द्विविधासंसारदायका ॥
जीवात्मयासी ॥ ५७ ॥ अविद्याप्रकृतीचाप्रवेश ॥ ह्मणूनिप्रकृतिऐसानिर्देश ॥ जीवपरम
पुरुषांचाअंश ॥ ह्मणूनपुरुषतो ॥ ५८ ॥ स्वरूपपरिपूर्णत्वाकारणें ॥ परमपुरुषऐसेंबोलणें ॥
हेंबृहदारण्यकातेंपुसणें ॥ नामनिर्वचन ॥ ५९ ॥ स्थूलदेहतोचिपुर ॥ तेथेंजीवानिद्रितनिरं
तर ॥ ह्मणूनितोपुरुषहेंउत्तर ॥ व्याकरणसिद्ध ॥ ६० ॥ ऐसींप्रकृतीपुरुषांचींद्वंद्वें ॥ उठलीं
अनादिसिद्धें ॥ हेंभगवद्गीतेंगोविंदें ॥ निरूपिलेंअसे ॥ ६१ ॥ ब्रह्मतेंतवनित्यशुद्ध ॥ ब्रह्मवि
वर्तअनादिसिद्ध ॥ मायामयजीवसृष्टीविविध ॥ तेहिअनादीची ॥ ६२ ॥ निरूपिलेंजेंअ

ज्ञान ॥ तेंजीवाचेंदेहकारण ॥ असोहेंव्यापीअन्यथाज्ञान ॥ लिंगदेहातें ॥ ६३ ॥ अविद्याद
र्पणींप्रतिबिंबत ॥ प्रविष्टजीवस्वरूपेंअनंत ॥ हिरण्यगर्भतेथेंसंचरत ॥ लिंगरूपें ॥ ६४ ॥
सूर्यदर्पणींप्रतिबिंबतां ॥ सरसीचचालेप्रकाशता ॥ तैसालिंगदेहप्रकटतां ॥ बिलंबनलगे ॥
॥ ६५ ॥ निर्विषयप्रथमस्फुरण ॥ तेंजाणावेंअंतःकरण ॥ संकल्पविकल्पात्मकमन ॥ ओ
ळखावेंपै ॥ ६६ ॥ स्फुरतपदार्थाचाआकार ॥ तेथींचाकीजेनिर्धार ॥ ऐसानिश्चयात्मकवृ
त्यंकुर ॥ तेबुद्धीजाणावी ॥ ६७ ॥ चित्तचेतव्यलक्षण ॥ जेंवृत्तीचेंस्फुरण ॥ अनुसंधानात्मक
जाण ॥ चित्तरूपें ॥ ६८ ॥ देहींअहंभावातेंउठवी ॥ पदार्थममतेतेंधरवी ॥ तोअहंकारजी
वातेंभोगवी ॥ सुखदुःखातें ॥ ६९ ॥ प्रकृतिपुरुषाच्यासमयोगीं ॥ अंतःकरणपंचकाच्या
अंगीं ॥ स्फुरतीयेचंचलतेच्यावेगीं ॥ झालेपंचप्राण ॥ ७० ॥ कवणप्राणाचेंकवण ॥ कैसें
स्वरूपलक्षण ॥ कवणव्यापारकवणस्थान ॥ तेंजाणावेंपैं ॥ ७१ ॥ आपादतलमस्तकदे
हातें ॥ व्यापूनिभोगीमुक्तरसातें ॥ देहींचियासर्वनाडीतें ॥ व्यापिलेंव्यानें ॥ ७२ ॥ समा
ननाभिदेशींवसे ॥ परीदेहाचेसर्वसंधीपैसे ॥ तेणेंलवतीआपैसे ॥ हस्तपादादिक ॥ ७३ ॥
उदानाचेंकंठस्थानमंदिर ॥ करीइच्छादिव्यापार ॥ स्वप्नदावीनानाविकार ॥ निद्रिस्थासी ॥

॥ २० ॥ तंवबोलेशिष्यचक्रवर्ती ॥ जीमहावाक्याच्यानाश्रुति ॥ भेदातेंसत्यत्वेंबोलती ॥
मिथ्याकैशाह्मणाव्या ॥ २१ ॥ द्वासुपर्णासयुजासखाया ॥ एवमादिकश्रुतिगुरुराया ॥
भेदसत्यबोलतीतरीकायया ॥ अप्रमाण ॥ २२ ॥ तंवअनाथाचावेळाइत ॥ बोलेश्रीगुरुनाथ ॥
सांगिजेलश्रुतिसंकेत ॥ तोऐकपांतूं ॥ २३ ॥ आधींपूर्वपक्षउद्धरिजे ॥ मगतोसर्वथैवदूषिजे ॥
स्वतांसिद्धप्रतिपादिजे ॥ तदनंतर ॥ २४ ॥ ऐसावेदशास्त्राचासमाचार ॥ ह्मणूनिश्रुतीकरितसे
भेदाचाउच्चार ॥ करुनिमगतयासीमार ॥ करीसर्वथैव ॥ २५ ॥ द्वासुपर्णासयुजा ॥ हेश्रुती
पूर्वपक्षीवुझा ॥ तरीतेथविषयींदुजा ॥ भावआथीचिना ॥ २६ ॥ एकमेवाद्वितीयंब्रह्म ॥ भेदातेंही
श्रुतिकरितसेभ्रम ॥ ह्मणुनिभेदवादियाचेधर्म ॥ सांडीपापरूप ॥ २७ ॥ आतांवचनएकएक ॥
बोलिजेलजेंसार्थक ॥ जेणेंपुरेकौतुक ॥ ऐक्यवादाचें ॥ २८ ॥ हिरण्यगर्भलिंगदेहावीण ॥
ब्रह्मांडपिंडनव्हेजाण ॥ पिंडकार्यब्रह्मांडकारण ॥ ह्मणुनिऐक्यतया ॥ २९ ॥ स्थितीस्वप्ना
वस्थेपासाव ॥ तेथींचेसांगेनअवयव ॥ सृष्टिजागृतीहेंनांव ॥ जयांसीबोलिजे ॥ ३० ॥
तूंह्मणसीजेस्वप्नावस्था ॥ तेतंवजागृतीचाउलथा ॥ तरीजागृतींतकार्यव्यवस्था ॥ कोविंघडे ॥
॥ ३१ ॥ येथें सांगेनपरिहार ॥ स्वप्नरूपाचानिर्धार ॥ मनासीविषयाचाव्यवहारतेंस्वप्न

बोलिजे ॥ ३२ ॥ मनींविषयवासनास्फुरे ॥ मगधांवेइंद्रियाचेनिद्वारें ॥ बुद्धोसीबाह्यविषयाचें ज्ञानस्फुरे ॥ तेजागृतीजाण ॥ ३३ ॥ ह्मणुनिस्वप्नावस्थाकारण ॥ जागृतीतत्कार्यजाण ॥ तयासीऐक्यहेंनिर्वचन ॥ बोलणेंनलगे ॥ ३४ ॥ विष्णुतैजसाचातनय ॥ ब्रह्माविष्णुहे अद्वितीय ॥ एवंपितापुत्रअद्वय ॥ तन्यायेंऐक्यतया ॥ ३५ ॥ स्वप्नावस्थाअंकुर ॥ तोहिरण्य गर्भाचाविस्तार ॥ तोहीअज्ञानलिंगाचाव्यवहार ॥ वटबीजन्यायें ॥ ३६ ॥ ह्मणुनिमाया अविद्येसी ॥ हिरण्यगर्भलिंगदेहासी ॥ ऐक्यपरस्परेंसी ॥ तेस्वभावसिद्ध ॥ ३७ ॥ प्रळयसुषुप्ती याकारण ॥ स्थितिस्वप्नावस्थातत्कार्यजाण ॥ तेथेंऐक्याचेंनिर्वचन ॥ करणेंचिनलगे ॥ ३८ ॥ विष्णुतैजसाचीउत्पत्ती ॥ तेरुद्रप्राज्ञापासावउपजती ॥ सत्वरजाशीतमींस्थिती ॥ ह्मणुनिऐक्य तया ॥ ३९ ॥ अज्ञानअव्याकृतातें ॥ आत्मज्ञानमूल मायाजनितें ॥ ह्मणुनितयांसीऐक्यनिरुतें ॥ जाणावेंपैं ॥ ४० ॥ प्रळयसुषुप्तीव्यालिया ॥ सर्वसाक्षित्वआणितुरिया ॥ कार्यकारणभावें तया ॥ जाणावेंऐक्यरूप ॥ ४१ ॥ रुद्रप्राज्ञाचेंमाहेर ॥ प्रत्यगात्मासर्वेश्वर ॥ तयासीऐक्य निरंतर ॥ असतचिअसे ॥ ४२ ॥ जयाकारणाचेंकार्य ॥ तेंतेणेसीजाणअद्वय ॥ यासकळातें गुणसाम्य ॥ प्रसवलेंजाणपैं ॥ ४३ ॥ एवंकार्यकारणासी ॥ ऐक्यबोलिजेमायामायेसी ॥

तरीतदुपाधिजीवेश्वरासीं ॥ ऐक्यसिद्धीची ॥ ४४ ॥ शबलहीतत्वंपदार्थासी ॥ ऐक्यजेथें
उभयांसी ॥ तेथेंशुद्धजीवेश्वरचैतन्यासी ॥ ऐक्यनबोलतांलाभे ॥ ४५ ॥ आतांअ होहा
ब्रह्मींचाविवर्त ॥ गुणसाम्यादिसमस्त ॥ प्रपंचब्रह्मेंशींव्यतिरिक्त ॥ तोकांहींचनव्हे ॥ ४६ ॥
जेंजेणेंवीणनाहीं ॥ तेंचितेंवस्तूपाहीं ॥ यापरीसकळब्रह्महीं ॥ प्रपंचजात ॥ ४७ ॥ जैसारज्जू
वीणसर्प ॥ कांहींचनभासतोआरोप ॥ ह्मणुनिरज्जूचितद्रूप ॥ ऐसेंजाणावें ॥ ४८ ॥ नातरी
आपुलेनिआंगें ॥ जळचितरंगाकारेंहोलागे ॥ तैसेंब्रह्मआभासूंलागे ॥ प्रपंचाकारें ॥ ४९ ॥
अलंकाराचीकुसरी ॥ सोनेंचिभासेनानापरी ॥ तैसेंपाहतांतत्वनिर्धारीं ॥ ब्रह्मचिविश्वरूपहें ॥
॥ ५० ॥ मुळाकडूनिपाहतां ॥ वृक्षचिपानेंखांदियासमस्तां ॥ ऐक्यऐसेंतत्वतां ॥ अनु
भवासिये ॥ ५१ ॥ वृक्षाग्रेंकडूनिपाहिजे ॥ तंवखांदियासीभेददेखिजे ॥ एकाचिवृक्षासीविभागिजे ॥
अवयवभेदें ॥ ५२ ॥ तैसेंएकचिब्रह्मलिंगातें ॥ विस्तारितीनानामतें ॥ तीपुढींमायासंकळितें ॥
ऐसेंजाणिजे ॥ ५३ ॥ सर्वंखल्विदंब्रह्म ॥ याश्रुतिवादासीआलेंवर्म ॥ ह्मणुनिभेदवादियाचें
मतनाम ॥ तूंह्मणेंवेसी ॥ ५४ ॥ पुरुषएवेदंसर्व ॥ हेंश्रुतिवादियाचेंगर्व ॥ सांडवितीह्मणूनि
अपूर्व ॥ अद्वैतमतपैं ॥ ५५ ॥ ब्रह्मैवसंसरति ॥ ब्रह्मैवविमुच्यतइति ॥ हेंश्रुतिभेदातंअसे

ग्रासिती ॥ ह्मणुनिसांडावेंतें ॥ ५६ ॥ थावरीहेंअद्वैत ॥ जयासीअनुभवलेंनिश्चित ॥ तेंजाणावें
मूर्तिमंत ॥ परब्रह्मपैं ॥ ५७ ॥ प्रपंचउपसंहारे ॥ केवळब्रह्मचिउरे ॥ तेंजाणावेंचतुरें ॥
अद्वैतमतपैं ॥ ५८ ॥ महाद्वैतअनारिसें ॥ येथेंकेवळब्रह्मचिप्रकाशे ॥ प्रपंचनिरसाचेंपिसें ॥
नलगेतेथें ॥ ५९ ॥ साचेंवोणनाहींलटिकें ॥ ह्मणुनिओळखावेंतयातेंमोटकें ॥ ऐसेंज्ञानहोय
नेटकें ॥ तेंमहाअद्वैत ॥ ६० ॥ जैशाआपुल्याचिलहरी ॥ पाणियासीनयेसरी ॥ तैसेंइन्द्रियांचे
व्यापारीं ॥ नलिंपेयोगिराज ॥ ६१ ॥ नातरीआपुलेंनितेजें ॥ जैसाअग्निनपोळिजे ॥ तैसा
योगेश्वरनलिंपिजे ॥ पुण्यपापातें ॥ ६२ ॥ जेंअग्नीसोवेगळें ॥ तेंचिअग्नीसंगेंजळे ॥
माअग्निकेंविपोळे ॥ निजतेजेंपैं ॥ ६३ ॥ तैसेंसर्वब्रह्मजिहींजाणिजे ॥ स्वयंब्रह्मआपणहोइजे ॥
तिहींकैसेनिबुडिजे ॥ भवसागरीं ॥ ६४ ॥ जयासीसकळब्रह्मझालें ॥ तयासीवेगळेंकाय
उरलें ॥ एकांतसेवणेंलागलें ॥ हेंआथीचिना ॥ ६५ ॥ मनजेथेंजेथेंजाईल ॥ तेथेंतेथें
ब्रह्मचिस्फुरेल ॥ तरीसमाधीनलागेल ॥ घालणीतया ॥ ६६ ॥ एकतयाचीप्रचीती ॥
जनकाचियाराज्यस्थिती ॥ नानासंभ्रमेंसेविती ॥ डंडळेना ॥ ६७ ॥ यद्यपिकेतुज्अवसर ॥ जरी
स्वरूपींपडेलविसर ॥ तितुकेनितयासंसार ॥ नाक्रूंसके ॥ ६८ ॥ कवणाकाचोअंतुरी ॥

मीसुवासिनीऐसेंविसरलीजरी ॥ तितुकेनिवैधव्यदुःखसागरीं ॥ कोंविबुडेतें ॥ ६९ ॥ तैसी
रजतमाचीआवृत्ती ॥ क्षणएकआवरिसंविती ॥ तितुकेनतयासंसृतो ॥ कायबोलूंयें ॥ ७० ॥
स्वात्मानुसंधानासरिसीं ॥ कर्मेंजळतीआपैसीं ॥ तयांसंसृतिकायसी ॥ बोलिजेल ॥ ७१ ॥
स्वप्नींचींकर्मेंविचित्रें ॥ अशेषजळतीप्रबोधमात्रें ॥ तयांसीप्रायश्चित्तआणिकेंशास्त्रें ॥ कवणें
बोलिजे ॥ ७२ ॥ जेंकोमळज्ञानेंआथिलें ॥ तरीनव्हतीसंसारासीपांगिलें ॥ पूर्णबोधेंब्रह्मझालें ॥
तेंबोलावेंकाय ॥ ७३ ॥ जासलठहोईजेजेणेंआंगें ॥ वैस्तोकातेणेंचिभागें ॥ तैसेंभलतेणेंअव
स्थासंगें ॥ नबाधिजेयोगिराज ॥ ७४ ॥ अग्निमाजीजेंपडिलें ॥ तृणकाष्ठाग्नीचीआतळे ॥
तैसेंपूर्णबोधेंसिब्रह्मझालें ॥ प्रपंचजात ॥ ७५ ॥ प्रवेशतांआपुल्याअंतःपुरीं ॥ रायातेंकवण
निवारीं ॥ जरीराखणाइतसहपरिवारी ॥ असतीकोटिसंख्या ॥ ७६ ॥ तैसीसंप्रज्ञातसमाधी ॥
प्रवेशतांकवणनिषेधो ॥ पूर्णबोधाशींनिजबोधी ॥ तेंस्वतंत्रकीं ॥ ७७ ॥ असतांइन्द्रियापार ॥
परीतोब्रह्मरूपेंव्यवहार ॥ पूर्णबोधासीसंसार ॥ परमार्थचि ॥ ७८ ॥ एवंद्विवासमाधीविया ॥
तैसीचालतांनेतीघडोया ॥ तळींउपरजाणवितीतया ॥ उपनिषदें ॥ ७९ ॥ तोसर्वेश्वराचा
अवतार ॥ जाणपूर्णबोधेंयोगींद्र ॥ कटाक्षमात्रेंसंसारज्वर ॥ फिटेजयाचेनी ॥ ८० ॥ तणेंसी

दर्शनस्पर्शन ॥ जयासीघडेसंभाषण ॥ तयाचेंपापविध्वंसन ॥ तेंहोयक्षणमात्रें ॥ ८१ ॥
सकलहीतपेंतीर्थें ॥ भवनिरासींनव्हतीसमर्थें ॥ तेंकरावेंश्रीगुरुनाथें ॥ एकेंपूर्णबोधेंची ॥ ८२ ॥
ऋषभदेवाचियेपरी ॥ निर्विकल्पदशाउठेजरी ॥ तेंब्रह्मज्ञानाचाग्रासकरी ॥ ब्रह्मचिन्मात्रजें ॥
॥ ८३ ॥ कर्मशेषेंदेहींवर्तती ॥ परीतेकर्मबंधनेणती ॥ देहींविदेहमुक्ती ॥ ऐसेंयातेंह्मणिजे ॥८४॥
विदेहमुक्ताचेंशरीर ॥ चिरकालनव्हेस्थीर ॥ तयेचरमदशेचायोगेश्वर ॥ विरळाचिपैं ॥ ८५ ॥
निर्विकल्पदशेविण ॥ जीवन्मुक्ताचेंकांहींचनव्हेन्यून ॥ तेंब्रह्मचिहोतीआपण ॥ तेथेंन्यूनतें
काय ॥ ८६ ॥ ब्रह्मैवसन्ब्रह्माप्येति ॥ विमुक्तश्चविमुच्यतइति ॥ हेंश्रुतिद्वयजीवन्मुक्ति ॥
बोलिजेलपूर्णबोधासी ॥ ८७ ॥ निर्विकल्पदशेविणसुटिका ॥ जरीनहोतीपैंऐका ॥ तरी
कांनराहतीशुकादिकदेखा ॥ तेथविषयीं ॥ ८८ ॥ नसुटतीजेचरमदशेविण ॥ ऐसेंबोलती
विवेकहीन ॥ तयाधीटवादियातेंकवण ॥ दंडीतसे ॥ ८९ ॥ शुकोमुक्तोवामदेवोमुक्त ॥
हेंश्रुतिवाक्यअसेबोलत ॥ शुकनेणेतरीभागवत ॥ कवणेंनिरूपिलें ॥ ९० ॥ ऋषभदेवप्रति
पाद्यें ॥ हेंश्रुतीचेनिसंवादें ॥ वामदेवादिकब्रह्मानंदें ॥ निवालेपैं ॥ ९१ ॥ वामदेवादियोगे
श्वर ॥ नव्हतीअंधमुकेबधिर ॥ निर्विकल्पदशानिरंतर ॥ हेंतंवतयासीनाहीं ॥ ९२ ॥

तरीवेदींजीवन्मुक्तबोलती ॥ तेथविपर्यीनाहींउपपत्ती ॥ ह्मणुनिसांडींदेहभ्रांती ॥ संशयरूप ॥
॥ ९३ ॥ प्रत्यक्षादिकप्रमाणें ॥ तयांसीसंभवतोदूषणें ॥ तरीश्रुतिवाक्यासीकवणें ॥ आरो
पिजेल ॥ ९४ ॥ काचआणिकमलादिक ॥ प्रत्यक्षासीदोषदेख ॥ तयातेंहीनविवेक ॥ मानिती
प्रमाणें ॥ ९५ ॥ पांचवेंजेंअनुमान ॥ तयासीप्रत्यक्षअसेदूषण ॥ तयासीस्वतंत्रकवण ॥
निगमींबोलिले ॥ ९६ ॥ अर्थातींउपमान ॥ तेथेंसादृश्यादिप्रमाण ॥ ह्मणुनिसत्तप्रमाणजाण ॥
वेदेंबोलिजे ॥ ९७ ॥ तथापिश्रुत्यनुसारें ॥ अप्रमाणेंहोतीप्रमाणांतरें ॥ ह्मणुनिस्वतंत्रप्रमाण
चतुरें ॥ वेदजाणावा ॥ ९८ ॥ प्रमाणांतराचीअपेक्षा ॥ श्रुतीसीनाहींविवक्षा ॥ ह्मणुनि
निरापेक्षा ॥ तूंचिएक ॥ ९९ ॥ वेदासीमानीअखंड ॥ तेंनमानितीजेपाखंड ॥ तयाधीटवादियाचें
तोंड ॥ कायनिवांतराहे ॥ १०० ॥ आतांअसोहायुक्तिप्रसंग ॥ जीवन्मुक्तसर्वत्रनिःसंग ॥
सरेकर्मप्रारब्धवेग ॥ तंवचिवर्ते ॥ १ ॥ प्रारब्धसंचितक्रियमाण ॥ हेंत्रिविधकर्मजाण ॥
तेंकर्मकैसेंकवण ॥ सांगिजेल ॥ २ ॥ जेणेंकर्मआरंभिलें ॥ तेणेंस्थूळदेहनिपजलें ॥ तेंदेहारंभ
कबोलिलें ॥ शुभाशुभकर्म ॥ ३ ॥ यास्थूळदेहानंतरें ॥ होतीजियाशरीरें ॥ तयांसीहेतुकर्म
विचित्रें ॥ तियेसंचितेंजाणावीं ॥ ४ ॥ जेंजेंकर्मसंचित ॥ फळव्यावयाहोयउदित ॥ तेंजाणावें

जाणत ॥ देहारंभक ॥ ५ ॥ स्थूलदेहेंकिजतअसिजे ॥ तेंक्रियमाणकर्मबोलिजे ॥ येणेंत्रिविधें
नबाधिजे ॥ तोयोगिराज ॥ ६ ॥ सुखदुःखाचेनिसमयोगें ॥ प्रारब्धकर्मक्षयासीजायवेगें ॥
जीवन्मुक्तह्मणेउगें ॥ गर्भवासातें ॥ ७ ॥ संचितकर्मासीअंत ॥ ज्ञानाग्नीनेंहोयनिभ्रांत ॥
जैसास्वप्नींचावृत्तांत ॥ जळेप्रबोधमात्रें ॥ ८ ॥ कर्मेंजींक्रियमाणें ॥ तींज्ञानोत्पत्तीहोतीलीनें ॥
यातीहींसंबंधीअकर्तेंपण ॥ आथीचिना ॥ ९ ॥ एवंकर्मपाशत्रिविधु ॥ ज्ञानाग्नीनेंहोयदग्धु ॥
ह्मणुनिमागुताभवसिंधु ॥ नाहींब्रह्मविदासी ॥ ११० ॥ देहींअसतांविदेह ॥ तेथेंदेहांतीं
कवणसंदेह ॥ ह्मणुनित्रिभुवनींनिःसंदेह ॥ तूंचिएक ॥ ११ ॥ स्वप्नींचियासिंहाचाठसा ॥
प्रबुद्धासींआभासेजैसा ॥ तोवियोगियाचेंशरीरसहसा ॥ असतूंचिअसेना ॥ १२ ॥ ततोन
विचिकित्सती ॥ ऐसेंश्रुतिअसेबोलती ॥ जरीजीवन्मुक्ताचीस्थिती ॥ कैसीनिरूपावी ॥ १३ ॥
आतांअसोतजीवन्मुक्त ॥ स्वस्वरूपातेंअनुभवित ॥ प्रपंचातेंअसेदेखत ॥ ब्रह्मरूपत्वें ॥ १४ ॥
जयाचेवेदबंदीजन ॥ तेंतूंब्रह्मनिरंजन ॥ होसीआपणयाआपण ॥ विश्वाकारेंतूं ॥ १५ ॥
जेंआत्यंतिकनिर्मळ ॥ परब्रह्मकेवळ ॥ तेंचितूंसकळ ॥ विश्वाकारें ॥ १६ ॥ नातरीघृता
चियाटांका ॥ जैसियाघृताच्याकणिका ॥ तेसेंब्रह्मतूंव्यापका ॥ जगदाकारें ॥ १७ ॥

जगजीवईश्वर ॥ तेथेंनाहींहाव्यवहार ॥ तेंतूंनिर्विकार ॥ परब्रह्म ॥ ११८ ॥ ऐसेंस्वरूपनिरू
पितां ॥ शिष्यासीझालीतन्मयता ॥ तूष्णीभूतझालावक्ता ॥ गुरुवचनाप्रती ॥ ११९ ॥
ब्रह्मानंदसागरीं ॥ मुरालीचित्तलहरी ॥ तेथेंचिउपमाकवणकरी ॥ तयासमाधीसुखाची ॥
॥ १२० ॥ ऐसागुरुशिष्यसंवाद ॥ म्यांकेलाविनोद ॥ ह्मणतीराजयोगीसिद्ध ॥
मुकुंदराज ॥ १२१ ॥ इतिश्रीमद्विवेकसिंधौसंहारक्रमेगुरुशिष्यसंवादेमहाद्वैतप्रतिपादनंनाम
नवमप्रकरणंसमाप्तम् ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥
श्रीगणेशायनमः ॥ ॥ आतांईयेनिरूपणीं ॥ जीवशीवगेलेहारपुनी ॥ तेंउरलेंनिदानीं ॥
आत्मरूप ॥ १ ॥ तेंतंवतुजअनुभविलें ॥ पुसणेंसांगणेंनाहींउरलें ॥ तथापिप्रांजळकरूनिसां
गितलें ॥ पाहिजेतरीऐक ॥ २ ॥ बोलणेंतरीघडे ॥ परीमौनमुद्रातोंनमोडे ॥ हेंबोलणेंतेणेंपाडें ॥
जाणिजेस ॥ ३ ॥ आत्मस्वरूपकींलक्षण ॥ तूंऐसेंआक्षेपिसीवचन ॥ तरीब्रह्मींचोखूण ॥
जेसच्चिदानंद ॥ ४ ॥ ब्रह्मतरीअद्वय ॥ तेथेंहेंपदत्रय ॥ कैसेंशोभेलहाविस्मय ॥ करणेंचिनलगे ॥
॥ ५ ॥ सतह्मणिजेशाश्वत ॥ तेंचिज्ञानह्मणूनिचित्त ॥ तेंचिस्वरूपयाळागींह्मणिजेत ॥
आनंदऐसें ॥ ६ ॥ ऐकेंप्रकारांतरेंनिरूपण ॥ अस्तिभातिप्रियपण ॥ हेंपदत्रयमिळून ॥ एकलें

ब्रह्म ॥ ७ ॥ अस्तिम्हणिजेआहे ॥ भातिम्हणिजेप्रकाशरूपहोय ॥ आणिआपणप्रिय ॥
अद्वयत्वें ॥ ८ ॥ यदस्तितद्भाति ॥ ऐसीअसेवेदश्रुती ॥ जेंआहेतेंचिप्रकाशरूपम्हणती ॥
तेंचिप्रिय ॥ ९ ॥ आद्यत्रयब्रह्मरूप ॥ ऐसेंशास्त्रबोलेस्वरूप ॥ यालागींवेगळेपणाचेंमाप ॥
धरूंनये ॥ १० ॥ सत्यंज्ञानमनंतंब्रह्म ॥ उपनिषद्वाक्यपरम ॥ तेंब्रम्हींचेंसांगितलेंवर्म ॥
परीत्रिधानव्हे ॥ ११ ॥ सच्छब्देंनित्यसन्मात्र ॥ ज्ञानशब्देंप्रासिरूपचिन्मात्र ॥ आनंदशब्दें
स्वानंदमात्र ॥ परब्रम्हतें ॥ १२ ॥ जैसाशुद्धआणितेजोमय ॥ ऊष्माभिन्ननिपदत्रय ॥ सूर्यतरी
अद्वय ॥ संचलाअसे ॥ १३ ॥ शुद्धआणिप्रकाशमय ॥ सीतलताभिन्ननिपदत्रय ॥ तरोचंद्रतंव
अद्वय ॥ संचलाअसे ॥ १४ ॥ श्वेततैसीचनम्र ॥ नम्रतीचीमधुर ॥ मधुरतीचीसाखर ॥ वेगळी
नसे ॥ १५ ॥ शुभ्रतोचिमृदू ॥ मृदूतोचिमकरंदू ॥ परीकर्पूरतंवअभेदू ॥ एकलाअसे ॥ १६ ॥
आरक्तआणिघन ॥ किरणफांकतीसंपूर्ण ॥ ऐसीयेपरींचेंरत्न ॥ एकलेंचिअसे ॥ १७ ॥ हिरवी
आणिसघन ॥ प्रभाफांकेहरितवर्ण ॥ परीतेपाचएकलीजाण ॥ अभिन्नत्वें ॥ १८ ॥ पिंगळा
आणिसुगंध ॥ अमृताऐसाअसेस्वाद ॥ परीअंबातंवप्रसिद्ध ॥ एकलाची ॥ १९ ॥ काळी
आणिकठिण ॥ वरीचक्रेंसुलक्षण ॥ परीगंडकीतवअन्य ॥ नव्हेजैसी ॥ २० ॥ नेत्रींसावळी

घ्राणीसुगंध ॥ जिव्हेसीअपूर्वस्वाद ॥ परीतुळसीमंजिरीस्वतःसिद्ध ॥ एकलीच ॥ २१ ॥ एवं नानाप्रमाणीं ॥ नानादृष्टांतसाधनीं ॥ सच्चिदानंदनिरूपणीं ॥ दुसरेंनाहीं ॥ २२ ॥ ग्रंथांतरीं निरूपणऐसें ॥ जेंअसज्जडदुःखअसे ॥ तयाचेंनिनिरासें ॥ सच्चिदानंद ॥ २३ ॥ तरीअसज्जड दुःखनासे ॥ ब्रम्हआलेंसच्चिदानंददशें ॥ ऐसेंम्हणतांआलेंहांसें ॥ महानुभावा ॥ २४ ॥ अहो ब्रम्हसच्चिदानंदनसतें ॥ तरीअसदादिकासयानेंनिरसतें ॥ म्हणुनिहेंआइतें ॥ सच्चिदानंद ॥ २५ ॥ सूर्यअंधारातेंनासी ॥ तेव्हांप्रकाशत्वयेत्यासी ॥ ऐसेंनव्हेप्रकाशराशी ॥ पहिलाचिअसे ॥ २६ ॥ छायेवरूनिपुरुषाचेंरूप ॥ कींपुरुषावरूनिछायेचेंहोयमाप ॥ छायेसीलयोद्भवआरोप ॥ पुरुष जैसातैसा ॥ २७ ॥ ऐसाहापरमपुरुष ॥ जेथेंछायेमायेचानाहींभास ॥ सच्चिदानंदस्वरूपसोस ॥ तोहीनाहीं ॥ २८ ॥ मुळींअसज्जडदुःखनाहीं ॥ तेसच्चिदानंदम्हणुंकाई ॥ परीनम्हणतांठाईच्या ठाई ॥ सच्चिदानंद ॥ २९ ॥ यालागींसत्तेंचिचित ॥ चित्तेंचिआनंद ॥ पदत्रयींअभेद ॥ एकलीवस्तु ॥ ३० ॥ एकमेवाद्वितीयंब्रह्म ॥ नेहनानास्तिकिंचनहेंवर्म ॥ तुजजाहलेंसुगम ॥ सद्गुरुकृपें ॥ ३१ ॥ जेव्हांपरोक्षपूर्णचैतन्य ॥ तेव्हांध्येयारोक्षप्रत्यक्चैतन्य ॥ आतांअपरोक्ष पूर्णचैतन्य ॥ प्रत्यकचैतन्यासांगकोठें ॥ ३२ ॥ जेव्हांप्रत्यक्चैतन्यनाहीं ॥ तेव्हांशिष्यत्वकैंचें

काई ॥ गुरुत्वहीठांईचेठाई ॥ पारुशलेंकीं ॥ ३३ ॥ ऐकूनिशिष्यशिरोमणी ॥ माथाठेवीसद्गुरु
चरणीं ॥ म्हणेब्रम्हसुखाचीशिराणी ॥ पुरविलीस्वामी ॥ ३४ ॥ मजमाझियानिरूपणीं ॥
सुखकेलेंपीयूषपानीं ॥ ब्रम्हासीब्रम्हत्वज्याचेनी ॥ तोतूंसद्गुरु ॥ ३५ ॥ मजब्रम्हत्वाचीनाहीं
चाड ॥ तुझेंभजनअत्यंतगोड ॥ भजनेंवीणकोड ॥ कांहींनाहीं ॥ ३६ ॥ तेंतुझेंभजनकैसें ॥
जेथेंशिष्यपणचिनुमसे ॥ ऐसेंअकृत्रिमएकरसें ॥ सुगमजेकां ॥ ३७ ॥ सुगमतुझियेकृपें
करूनी ॥ तूंउदासतेंदुर्गमजनीं ॥ ऐसीभक्तीमजलागुनीं ॥ दीधलीचदेई ॥ ३८ ॥ तुझेभक्तीनें
ऐसेंकेलें ॥ तेंमीनविसंबेपाउलें ॥ ऐसेंम्जदिधलें ॥ पाहिजेदेवा ॥ ३९ ॥ तुझेठाईप्रेमभाव ॥
जीवगेलापरीतेनजाव ॥ ऐसाप्रार्थिलागुरुदेव ॥ शिष्यरायें ॥ ४० ॥ तंवतोअनाथाचानाथ ॥
सद्गुरुजोसमर्थ ॥ ह्मणेसर्वसिद्धांतमथितार्थ ॥ तुजचीपावला ॥ ४१ ॥ हेंवेदाचेंसर्वस्व ॥
येथेंपाखंडियानाहींविश्वास ॥ जेंब्रह्मप्राप्तीवरीभक्तीचासोस ॥ कायह्मणुनी ॥ ४२ ॥ तरीब्रह्म
प्राप्तीचीपदवी ॥ तिहींकानींचीऐकावी ॥ परीसद्गुरुभजनेंवीणअनुभवी ॥ नव्हतीचकीं ॥ ४३ ॥
तेआपुलीयाचिमती ॥ नानापरीच्यायुक्तीचाळिती ॥ परीसाधुवचनींचित्तवृत्ती ॥ देतीचना ॥
॥ ४४ ॥ ज्यांसीनाहींसाधुभजन ॥ त्यांसीहेंतत्त्वज्ञान ॥ उपदेशूंनयेपयःपान ॥ भुजंगाजसें ॥

॥ ४५ ॥ ऐसेंऐकूनिअनुशासन ॥ म्हणशीलमीधरोनमौन ॥ हेंहीनकरावेंआपण ॥ प्राप्तपुरुषें ॥
॥ ४६ ॥ शुद्धसात्विकगुरुभक्त ॥ शुद्धमतीआणिविरक्त ॥ ऐशियाशिष्यासीयथोक्त ॥ उपदेशकरीं
॥ ४७ ॥ तरीउपयोगहोईल ॥ अन्यथावायांजाईल ॥ परीतुझीस्तुतोवाढेल ॥ किंवाढळे
लऐसेंनाहीं ॥ ४८ ॥ तुझियेसहजस्थितीमाजीपाहीं ॥ पात्रापात्रआलेंचीनाहीं ॥ तथापी
उपदेशसमर्थी ॥ पात्रापात्रविचार ॥ ४९ ॥ पूर्वीलजेमहानुभाव ॥ तैसाआचारतैसाचि
भाव ॥ तैसाचितयाअनुभव ॥ प्राप्तहोय ॥ ५० ॥ यालागींमूळगुरुआरंभून ॥ कीजेपूर्व
जांचेंकथन ॥ आणिसांगिजेलत्यांचेंआचरण ॥ ह्मणेमुकुंदराजयोगी ॥ ५१ ॥ इतिश्रीमद्विवेकासिं
धौसंहारक्रमेगुरुशिष्यसंवादेसच्चिदानंदपदत्रयविवरणंनामदशमप्रकरणंसमाप्तम् ॥ १० ॥ ॥
श्रीगणेशायनमः ॥ ॥ परमात्मासर्वेश्वरु ॥ जोसर्वज्ञपरात्परु ॥ तोचिएकआदिगुरु ॥ सकळ
जीवांसी ॥ १ ॥ तयाचेनिप्रसादें ॥ सनकादिकयोगिवृंदें ॥ तरलेलीलाविनोदें ॥ भवसागर ॥ २ ॥
तेथीलअनुग्रहजरीघडे ॥ तरीज्ञानहोयरोकडें ॥ मगसंसाराचेंसांकडे ॥ तेंकवणासीपैं ॥ ३ ॥
ईश्वरअनुग्रहाविण ॥ नाहींपापनिकृंतन ॥ ह्मणुनितोचिएकजाण ॥ भवनिरसनासी ॥ ४ ॥
जैसादीपापासावदीप ॥ तेथेंनाहींआणिकआरोप ॥ निजतेजेंअन्यरूप ॥ मुख्यबिंबाचितें ॥ ५ ॥

वातीचेदळवाडे ॥ तेणेदीपअन्यअन्यघडे ॥ परीतेजतेंएकचिफुडें ॥ मुख्यदीपाचें ॥ ६ ॥
एकादीपाचाप्रकाश ॥ घरोघरींहोयबहुवस ॥ पराउणीवचासोस ॥ नाहींमुख्यदीपीं ॥ ७ ॥
तैसाईश्वरासीसबंध ॥ जयाघडेदैवेंसिद्ध ॥ तोजाणावाप्रसिद्ध ॥ ईश्वरावतार ॥ ८ ॥ याचिपरी
शिष्यपरंपरा ॥ तेजाणईश्वरावतार ॥ अज्ञानाचेअंकुर ॥ तेथेंआथीचिना ॥ ९ ॥ ईश्वराचाज्ञान
दाहक ॥ जेथेंप्रगटलानिःशेष ॥ तेथेंजीवित्वाचाकलंक ॥ उरेलकैसेनी ॥ १० ॥ ज्ञानविग्रहो
ईश्वर ॥ तोचिझालायोगेश्वर ॥ तेथेंदेहद्वयाचाव्यवहार ॥ तोतंवसाचनव्हे ॥ ११ ॥ सृजीतसृ
ष्ट्यादिकार्य ॥ ईश्वराचेंसकळऐश्वर्य ॥ हेंजाणावेंबहुआश्चर्य ॥ जयाचेंतेणेंचिपैं ॥ १२ ॥ सृष्ट्यादि
कार्यकरणें ॥ तेंयोगेश्वरकांनेणे ॥ ऐशाआक्षेपींशाहाणें ॥ तेंऐकजसु ॥ १३ ॥ योगेश्वराचेंदेह
द्वय ॥ तेतंवअविद्यामय ॥ तरीनिपजेलसृष्ट्यादिकार्य ॥ कैसेंनिपां ॥ १४ ॥ परब्रह्मींअसतां
व्यापार ॥ सृष्ट्यादिकार्यकरीयोगेश्वर ॥ हाअशेषमायिकव्यवहार ॥ नाहींशुद्धचैतन्यीं ॥ १५ ॥
परब्रह्मींचेनिअंगलगें ॥ सृष्ट्यादिकार्यमायाकरूंलागे ॥ ततयेचेनियोगें ॥ आरोपितीईश्वरीं ॥ १६ ॥
आणिअविद्येचेंमहिमान ॥ तेंतंवअत्यंतहीन ॥ ह्मणूनिसृष्ट्यादिनिर्माण ॥ नघडेयोगेश्वरीं ॥ १७ ॥
आणीकएकविचार ॥ साचनव्हेसृष्ट्यादिव्यापार ॥ तोहीएकसंसार महास्थूल ॥ १८ ॥

आतांअसोहायुक्तिविस्तार ॥ सृष्टयादिकार्यकरीजगदीश्वर ॥ तोहीकरीतसेयोगेश्वर ॥ तेणेंचि
न्यायें ॥ १९ ॥ एकचिजगदीश्वर ॥ उपाधिवशेंविश्वाकार ॥ तैंईश्वरेंसीकैंचेंअंतर ॥ जीवन्मु
क्तासी ॥ २० ॥ ईश्वरींचेंईश्वरपण ॥ तेथेंहेंचिपरमकारण ॥ जेंनलभेआपणयाआपण ॥ कव
णेकाळीं ॥ २१ ॥ स्वरूपातेंविसरतां ॥ तरीईश्वरकवणबोलिजेता ॥ जीवाचियापरीसोसिता ॥
यातायाती ॥ २२ ॥ ह्मणोनिज्ञानविग्रहीईश्वरु ॥ तोचिब्रह्मविदगुरु ॥ तेथेंकरितांअन्यथा
विचारू ॥ असेमहादोष ॥ २३ ॥ यस्यदेवेपराभक्ति ॥ यथादेवेतथागुरौश्रुति ॥ ईश्वरगुरूसी
एकयस्थिती ॥ उपदेशीतसे ॥ २४ ॥ कवणएकमहामूर्ख ॥ गुरूसीदेखेजीवत्वाचातक ॥ तया
सीहोयमहानर्क ॥ रौरवादिक ॥ २५ ॥ जयाचेंनिभवव्यथातुटे ॥ अज्ञानापासूनिसुटे ॥ तो
ईश्वरहेंनघटे ॥ कायह्मणुनी ॥ २६ ॥ गुकारतोअज्ञानअंधकार ॥ तयासीनिरासकरीरुकार ॥
करितसेअज्ञानाचासंहार ॥ ह्मणोनितोगुरुह्मणिजे ॥ २७ ॥ गुरुतोवस्तघनवट ॥ लघुत्वेंबोली
हकुवट ॥ गुरुतोब्रह्मनिघोट ॥ ह्मणुनिगुरुह्मणिजे ॥ २८ ॥ आतांअसोहामतिप्रकाश ॥ शिष्य
जाणागुरुवंश ॥ तेथेंधरावाविश्वास ॥ ईश्वरबुद्धी ॥ २९ ॥ जंवनेणिजेगुरुसंतती ॥ तंवनफिटे
अज्ञानगती ॥ नप्रकटेस्वयंज्योती ॥ ब्रह्मसूर्य ॥ ३० ॥ वेदशास्त्रपुराण ॥ तयासीबोलतीअधः

पतन ॥ जयासिनाहींपरिज्ञान ॥ गुरुपरंपरेचें ॥ ३१ ॥ ह्मणुनिशिवादिगुरुपर्यंत ॥ जाणावेते
अवधूत ॥ जेअमूर्तमूर्तिमंत ॥ परब्रह्म ॥३२॥ परीसांगिजेतीअवधूत ॥ जेनिजानंदभरित ॥ जयाची
महिमाविख्यात ॥ लोकत्रयीं ॥ ३३ ॥ तरीआदिगुरुश्रीआदिनाथ ॥ तेथूनिश्रीहरीनाथ ॥ तयाचा
शिष्यरघुनाथ ॥ जोगुणसिंधु ॥३४॥ तयासिद्धाचेंचरित्र ॥ सांगिजेलविचित्र ॥ महापातकछेदनप
वित्र ॥ श्रवणमात्रें ॥ ३५ ॥ जीवाचेंअंतःकरण ॥ झालेंकलिमलिन ॥ ह्मणुननप्रगटेआत्म
ज्ञान ॥ स्वस्वरूपाचें ॥ ३६ ॥ तेवेळींकृपाळूबाचाराणा ॥ जीवांचोकरावयाससोडवणा ॥
अवतरलाआपण ॥ श्रीवैकुंठनाथ ॥ ३७ ॥ बाणगंगेच्यातीरीं ॥ मनोहरअंबानगरी ॥ तेथें
प्रगटलेश्रीहरी ॥ जगदीश्वर ॥ ३८ ॥ माध्यंदिनींशाखे ॥ अवतारकेलापरमपुरुषें ॥ चांपेगो
रटेंनिवेशें ॥ अतिमनोहर ॥ ३९ ॥ श्रीवत्सपदलपविलें ॥ दक्षिणजंवेसमाविलें ॥ कलयुगीं
अवतरणकेलें ॥ ह्मणुनियां ॥ ४० ॥ वर्ततांमनुष्यवेशें ॥ तयातेंकोणोचनोळखे ॥ प्रत्यक्षनि
धाननदेखे ॥ जैसादैवहीन ॥ ४१ ॥ जयाचेंनामसंकीर्तन ॥ करितांपापनिकृंतन ॥ तयासी ॥३४॥
मेखलाबंधन ॥ पिताकरिताझाला ॥ ४२ ॥ वेदशास्त्राचाअभ्यास ॥ जयासीकरितांनलगे
आयास ॥ जोचतुर्विधवाचेचाईश ॥ तेथेंविस्मयकैंचा ॥ ४३ ॥ हरिनामेंसाक्षात ॥ अवतरला

अनंत ॥ तेर्थांचीमहिमाविख्यात ॥ भविष्योत्तरपुराणींबोलिली ॥ ४४ ॥ माझीअतिमंद
वाणी ॥ मीमहिमाकायवाखाणी ॥ जोवर्णितांवेदशास्त्रपुराणीं ॥ अगाधमहिमा ॥ ४५ ॥ जै
साश्रीकृष्णाचाअवतारु ॥ तेणेंसंदीपनकेलागुरु ॥ वाराणसीयेशंकरु ॥ तेणेंप्रसन्नकेला ॥ ४६ ॥
बारावर्षेंपाशुपत ॥ आचरलामहाव्रत ॥ तेणेंपार्वतीसहित ॥ शंभूप्रसन्नकेला ॥ ४७ ॥ नातरी
दत्तात्रयमुनीश्वर ॥ जोमहाविष्णुचाअवतार ॥ तेणेंप्रसन्नकेलागुरुशंकर ॥ गौतमतीरीं ॥ ४८ ॥
तयाचीपरीअतिगहन ॥ हरीनेंआदरिलेंअनुष्ठान ॥ तेणेंतपेंत्रिभुवन ॥ पोळतेंझालें ॥ ४९ ॥
मगआपुलेनिइच्छावशें ॥ अनुष्ठानाचेनिदशांशें ॥ हवनआरंभिलेंपरेशें ॥ हरीनेंमहाकुंडीं ॥ ५० ॥
तेथेंमहाधूमप्रकटला ॥ गगनासीउपरमला ॥ तोजैसाजाणुनिघाला ॥ श्रीमहादेवासी ॥ ५१ ॥
होमधूम्रेंशामळ ॥ झालेंनभमंडळ ॥ तिळाहुतींचापरिमळ ॥ फांकेदाहीदिशें ॥ ५२ ॥ तंवहो
तासमवेत ॥ हवनकरीहरिनाथ ॥ नवग्रहपरिवारीत ॥ पुरंदरजैसा ॥ ५३ ॥ झालीहोमाची
समाप्ती ॥ मगआदरिलीपूर्णाहुती ॥ तेथेंप्रगटलास्वयंज्योती ॥ घृतधारेसरिसा ॥ ५४ ॥ ज्या
पूर्णाहुतीज्वाळा ॥ गगनचुंबितविशाळा ॥ कनकवर्णसोज्वळा ॥ मजतैशीगमली ॥ ५५ ॥
नातरीस्रष्टयानेंकनकदंड ॥ गगनछत्रारोविलाप्रचंड ॥ तेथेंप्रगटेचंद्रचूड ॥ ह्मणूनियां ॥ ५६ ॥

जैसीगगनाच्यादेऊळीं ॥ ज्वाळाशिवलिंगप्रगटली ॥ मगस्नपनविधीआरंभिली ॥ हरीनेंघृतधारें
॥ ५७ ॥ असोतियेज्वाळेआंत ॥ शंभूप्रगटलानभीह्मणत ॥ जोभक्तांचावेळाइत ॥ कृपासिंधू ॥
॥ ५८ ॥ तिन्हीदेवगुणमूर्ति ॥ तयादेवांचियाशक्ती ॥ तोदेखिलास्वयंज्योती ॥ श्रीआदि
नाथ ॥ ५९ ॥ मगहरीसीगाढआलिंगन ॥ दिधलेंजगदीश्वरेंआपण ॥ क्षणएकदोघेझालेलीन ॥
आनंदसागरीं ॥ ६० ॥ सुखासीमहासुखभेटलें ॥ किंवास्वानुभवासीपडपजोडिलें ॥ तैसेआ
नंदेंफुंजोंलागले ॥ हरिशंकरते ॥ ६१ ॥ जैसाझालियाविद्युल्लतापात ॥ जगहोयविकलित ॥
तैसेरुद्रतेजेंमूर्छित ॥ झालेऋत्विजगण ॥ ६२ ॥ तेथेंकायवर्तलें ॥ तेंहोतांनाहींजाणिलें ॥ तरी
तेथेंजेंवितलें ॥ तेंअवधारिजे ॥ ६३ ॥ मगसदाशिवेंजाणितलें ॥ तंवहरीनेंविनविलें ॥ जोप्रेम
देईआपुलें ॥ श्रीआदिनाथा ॥ ६४ ॥ जोतुमचियाकृपेचेलवलेशें ॥ फिटलेंजीवाचेंअज्ञान
पिसें ॥ केलेंसाम्राज्यपदआपैसें ॥ गीवसीनपावे ॥ ६५ ॥ ब्रह्मयासीब्रह्मपद ॥ विष्णुसीविष्णु
पद ॥ रुद्रासीरुद्रपद ॥ प्रसादेंजयाचेनी ॥ ६६ ॥ जयाचियासत्ता ॥ सकळजीवांसीआस्ति
कता ॥ तेंपरमचैतन्यतत्वता ॥ तूंचिएक ॥ ६७ ॥ जेथींचियाज्ञप्तिकळा ॥ जीवासीजाणिवे
चासोहळा ॥ तेंपरमचैतन्यकेवळा ॥ तूंचिएक ॥ ६८ ॥ द्विपदादिकेंदेहनगरें ॥ रचूनिवस

विलींतुवांशंकरें ॥ तेथेंअहंतेचेबडिवारें ॥ झालासीजीवरूप ॥ ६९ ॥ स्वस्वरूपींनविटत ॥
असतीतूंसकळहेत ॥ जैसाक्षीराब्धीउचंबळत ॥ निजतरंगीं ॥ ७० ॥ तत्वतातूंनिर्विकार ॥
परब्रह्मनिराधार ॥ तेणेंतुवांअधिष्ठिलासाकार ॥ सुंदरमूर्तिहे ॥ ७१ ॥ शांभवीतुझ्यावामांगीं ॥
विश्वमंगलतत्वांगीं ॥ अविनाशपणेंतुजभोगीं ॥ शिवानंदहे ॥ ७२ ॥ तूंचैतन्यरूपहेचिती ॥
स्वसंवेद्यहेस्थिती ॥ तूंपरमानंदहेअनुभूती ॥ स्वयंप्रकाश ॥ ७३ ॥ तुह्मीपरौतेंपरौतें ॥ दोघें
निजानंदभरितें ॥ अमूर्तझालामूर्तिमंतें ॥ भक्तानुग्रहासी ॥ ७४ ॥ जेपडलेसंसारघोरबंदीं ॥
नेणतीआपुलीशुद्धी ॥ जयजयकरुणानिधी ॥ तुवांताराविंजी ॥ ७५ ॥ तरीज्ञानद्यावेंस्वानुभव ॥
जेणेंचुकतीभवार्णव ॥ भेटेनिराकारनिरवयव ॥ परब्रह्मजें ॥७६॥ ऐसेंहरीनेंविनविलें ॥ तंवमहादे
वेंहास्यकेलें ॥ हेंसिद्धचिकायमागितलें ॥ सर्वज्ञरायातुवां ॥७७॥ तथापितुझाविनोद ॥ तरीदीजे
केवळनिजबोध ॥ आणिकहीवरप्रसाद ॥ मागशीजो ॥ ७८ ॥ तुझीयासंप्रदायाचीउडी ॥ पडे
लजयाचेहृदयकुंडीं ॥ तयासीज्ञानाचीसांकडीं ॥ कांहींचनाहीं ॥ ७९ ॥ तुझ्यावचनींधरिती
विश्वास ॥ तयांसीनाहींगर्भवास ॥ तयाचाअभिमानीमीमहेश ॥ ह्मणवूनिथा ॥ ८० ॥ माझें
ज्ञानप्रगटेल ॥ तुझ्यावदनींप्रकाशेल ॥ तेंशिष्यदेहींसंक्रमेल ॥ गुरुकृपाद्वारें ॥ ८१ ॥ ऐसें

आदिनाथबोलिले ॥ तंवहरीनेंमुखपसरिलें ॥ तेथंतेजोमयप्रकाशले ॥ जगदीश्वर ॥ ८२ ॥
सदाशिवाचेनिकृपावेशें ॥ शांभवतेजाचेनिसमावेशें ॥ तेवेळींचित्तसमरसें ॥ हरीचेंपरब्रह्मी ॥
॥ ८३ ॥ निर्विकल्पसमाधीप्रगटली ॥ दृष्टीअर्धोन्मीलितझाली ॥ अहंतानिःशेषनिमाली ॥
ब्रह्मानंदसागरीं ॥ ८४ ॥ प्राणाचेंस्फुरणस्फुंदन ॥ मनासरिसेंझालेंलीन ॥ तेथींचियाआनं
दातेंकवण ॥ निवडीलपैं ॥ ८५ ॥ जैसेंमहाप्रळयींजळ ॥ उठलियाभरेब्रह्मगोळ ॥ तेथेंबुडाले
सकळ ॥ कोणजाणे ॥ ८६ ॥ तेथंब्रह्मानंदेंचेववितें ॥ आणिकनाहींराखतें ॥ ब्रह्मानंदाचि
आपणातें ॥ अनुभवितसे ॥ ८७ ॥ एकाचीजिव्हाअमृतेंविटे ॥ तयासीअन्नरसाचापांगफिटे ॥
कांहींएकहेउपमाघटे ॥ तयास्वानुभवासी ॥ ८८ ॥ नातोक्षीरसागरू ॥ आपुलीचवीजाणे
निर्धारू ॥ तरीहेउपमायेइलकरूं ॥ स्वानुभवासी ॥ ८९ ॥ अथवानिरालंबगगन ॥ जरीजाणे
आपुलेंपूर्णपण ॥ तरीहेउपमासामान्य ॥ तयास्वानुभवासी ॥ ९० ॥ आतांअसोहेऋत्विज
गण ॥ पडिलेहोतेसंज्ञाहीन ॥ तेहोऊनिलब्धस्मरण ॥ उठतेझाले ॥ ९१ ॥ तेथेंब्रह्मग्रहप्रग
टला ॥ तेणेंहरीसीबळीघेतला ॥ ऐसेंह्मणूनिपळताझाला ॥ होतासमूह ॥ ९२ ॥ तंवयेरीकडे
दिवसांबाविसां ॥ हरीसीसुलीनदशा ॥ मगसमाधीविसर्जूनिआपैसा ॥ उठताझाला ॥ ९३ ॥

जडचर्याआचरत ॥ पिशाचवत्खेळत ॥ निजानंदेंडुल्लत ॥ हरियोगिराज ॥ ९४ ॥ ढाळेंढाळें
चालणें ॥ विसरतविसरतबोलणें ॥ कांहींनेणोनिहांसणें. ॥ हरिनाथासी ॥ ९५ ॥ कर्मवासना
सरली ॥ विवेकींइच्छानिमाला ॥ हरीसीपूर्णदृष्टीझाली ॥ ह्मणवूनियां ॥ ९६ ॥ नाहींवस्त्र
परिधान ॥ कोणासीगोष्टीसंभाषण ॥ जेथेंथोरनाकांहींसाधन ॥ तेंआर्थीचिना ॥ ९७ ॥ त्रिका
ळींनिरंजन ॥ हरिकरीअर्चन ॥ हेंआश्चर्यसकळजन ॥ देखतेझाले ॥ ९८ ॥ समस्तदेवता ॥
घरींपुरवितीवस्तुजाता ॥ उपतिष्ठतीचिंतिता ॥ ऋद्धिसिद्धी ॥ ९९ ॥ अचिंत्यअनंतशक्ती ॥
हरीतेओळंगती ॥ महासिद्धीखेळती ॥ दृष्टिपुढां ॥ १०० ॥ जयातेंअवलोकनकरी ॥ परम
पुरुषश्रीहरी ॥ तयास्वानुभवाचीभरोवरी ॥ होयआपसयाची ॥ १ ॥ सुरेंद्रभारतीमुख्य ॥ हरी
नेंबोधिलेशिष्य ॥ परीकृपाअसंख्य ॥ फळलीरामचंद्रीं ॥ २ ॥ कृपादृष्टीसरसी ॥ समाधीप्रव
र्तलीरामासी ॥ उन्मेषघेऊनिमानसीं ॥ ब्रह्मानंदतो ॥ ३ ॥ अठरादिवसपर्यंता ॥ झालीउन्म
नीअवस्था ॥ मनाचियावृत्तीसमस्ता ॥ खुंटलीयापैं ॥ ४ ॥ मगसमाधीविसर्जिली ॥ तुरीया
वस्थाप्रवर्तली ॥ जियेचेनिसकळसृष्टीझाली ॥ शिवात्मकहे ॥ ५ ॥ वर्णाश्रमाचापांग ॥ नकरी
रामनिःसंग ॥ अखंडफळलाराजयोग ॥ ह्मणूनियां ॥ ६ ॥ कर्माचरणींआचरणीं ॥ प्रत्यवाय

गेलाजळोनी ॥ पापवासनाहेमनीं ॥ आथीचिना ॥७॥ रामगुणाचासागर ॥ कींमहिमेचाआगर ॥
ब्रह्मविद्यादेताउदार ॥ तोचिएक ॥८॥ एकमुख्यचतुरानन ॥ कींद्विभुजमधुसूदन ॥ नातोसमदृष्टी
महेशान ॥ श्रीरामचंद्र ॥९॥ गर्वरहितमहेंद्र ॥ कींऊर्मिरहितज्ञानसमुद्र ॥ नातोनिष्कलंकचंद्र ॥
श्रीरघुनाथ ॥ ११० ॥ रघुनाथाच्यागुणीं ॥ समाननाहींत्रिभुवनीं ॥ ह्मणूनितोचिएकयोगी
जनीं ॥ वंदिजेरामचंद्र ॥ ११ ॥ अनेकशिष्यांप्रतीबोधिलें ॥ तेब्रह्मसुखेंनिवाले ॥ ब्रह्मविद्येचें
तारूकेलें ॥ सकळजनांसी ॥ १२ ॥ मेघांच्याधारागणवती ॥ पृथ्वीचेपरमाणूमोजवती ॥ परी
रघुनाथाचेगुणनवर्णवती ॥ शेषादिकां ॥ १३ ॥ माझ्यामतीचाविस्तार ॥ तोविवेकमदथोर ॥
राममहिमेचापार ॥ केविंवर्णवेल ॥ १४ ॥ म्यांसांगितलीगुरुसंतती ॥ ऐकतांहोयपापनि
वृत्ती ॥ ह्मणूनिश्रद्धापूर्वकचित्तीं ॥ एकावेंपैं ॥ १५ ॥ सूर्यबाह्यतमनिरसी ॥ परीअंतरींन
प्रकाशी ॥ तेंअज्ञानतमआपैसीं ॥ फिटेगुरुप्रसादें ॥ १६ ॥ नलगेवेदशास्त्राचापांग ॥ अभ्या
सावानलगेअष्टांग ॥ जरीपाविजेराजयोग ॥ श्रीगुरुप्रसादें ॥ १७ ॥ तपतीर्थाचीडांगोरे ॥
श्रुतिस्मृतीचीकामारें ॥ त्यांचेंअज्ञानकाविरेनुरे ॥ एकेंज्ञानेंविण ॥ १८ ॥ निर्वाळलयाभक्तएक
चांग ॥ जरीआचरेलराजयोग ॥ परोनफिटतांअज्ञानपांग ॥ सुटकानाहीं ॥ १९ ॥ भक्तचक्र

चूडामणी ॥ उद्धवएकत्रिभुवनीं ॥ तोहीअपरोक्षज्ञानदेऊनी ॥ सोडविलाश्रीकृष्णें ॥ १२० ॥
भलतसेंतपकीजे ॥ भलताजपजापिजे ॥ परीज्ञानेंवीणनसुटिजे. ॥ अज्ञानबाहिर्मुखीं ॥ २१ ॥
ह्मणूनिसहसाजन्मावें ॥ ईश्वरातेंओळखावें ॥ तेणेंचित्तशुद्धिद्वारेंपावावें ॥ ज्ञानअपरोक्षतें ॥
॥ २२ ॥ भवपाशतोडितेंशस्त्र ॥ ज्ञानखड्गईश्वराचेंविचित्र ॥ परीजीवांचेंकैसेंकर्मसूत्र ॥ जीअना
वडजेथें ॥ २३ ॥ तेंस्वानुभवज्ञान ॥ नपाविजेगुरुकृपेविण ॥ ह्मणूनितेथींचेंमाहिमान ॥ अगा
धअसे ॥ २४ ॥ आतांअसोहींबोलणीं ॥ म्यांजीगुरुस्तुतीकेली ॥ तीप्रीतीपावली ॥ गुरुपरं
परे ॥ २५ ॥ मजचातुर्यदशानजोडे ॥ ह्मणूनिहेंबोबडें ॥ जैसेंऊंसदोसतीवांकुडे ॥ परीअंतरीं
रसाळ ॥ २६ ॥ श्रृंगारादिनवरस ॥ हेजेथेंदिसतीविरस ॥ तेंपरब्रह्मएकरस ॥ जाणावेंपैं ॥
॥ २७ ॥ कस्तुरीकोरकाळी ॥ परिमळतांसौभरेआगळी ॥ तैसीआर्षहीबोली ॥ परीब्रह्मसु
खाची ॥ २८ ॥ सद्यःज्ञानोत्पत्तिऐशीप्रतिज्ञा ॥ तरीतेथेंनकरावीअवज्ञा ॥ ग्रंथश्रवणमात्रें
सर्वज्ञा ॥ होइजेपैं ॥ २९ ॥ रसिकमुद्राबोलिजेल ॥ तरीग्रंथाचाविस्तारपाविजेल ॥ परीपरमार्थ
नकळेल ॥ मथिताक्षरेंविण ॥ १३० ॥ येग्रंथींचेंहेंचिआश्चर्य ॥ जेंरोकडेंस्वानुभवसौंदर्य ॥ ह्मणू
निऐकतीमुनिवर्य ॥ विवेकासिंधु ॥ ३१ ॥ जयासीनाहींप्रतीती ॥ नेणतीतर्कमुद्रेचीस्थिती ॥

तयालागींमराठियाउक्ती ॥ केलीग्रंथरचना ॥ ३२ ॥ उपार्जनाचाश्रमनेणेबाळ ॥ तयाचेमुखीं
मिष्टान्नकेवळ ॥ सुयेजेवींजननीकृपाळ ॥ अपत्यविषयीं ॥ ३३ ॥ उपनिषदाचेंनिर्मिंत ॥ काढू
निकेलाहाग्रंथ ॥ तेंचिकरीतशिष्यजात ॥ सिद्धभाक्ते ॥ ३४ ॥ वेदांतशास्त्राचामथितार्थ ॥ जो
बोलेपरमार्थ ॥ येणेंओळखिजेहृदयांत ॥ श्रोतेजनीं ॥ ३५ ॥ यासंप्रदायाचाअभिमानी ॥ स्व
येंआपणशूळपाणी ॥ तरीप्रीतिपावोतेथवचनीं ॥ सर्वेश्वरीं ॥ ३६ ॥ संपलेंयाग्रंथाचेंउत्तरार्ध ॥
जेंनिर्गुणनिरुपमप्रसिद्ध ॥ ह्मणतीराजयोगीसिद्ध ॥ मुकुंदराज ॥ १३७ ॥ इतिश्रीमद्विवेकसिं
धौगुरुशिष्यसंवादेगुरुप्रशंसानिरूपणंनामएकादशप्रकरणंसमाप्तम् ॥ ११ ॥ ॥ ॥



# विवेकसिंधूंतील कठीण शब्दांचा कोश.

अ

**अघटमान**—घडण्यास अशक्य

**अजहल्लक्षणा**—अत्यागलक्षणा

**अतौतें**—सामर्थ्यें

**अत्रार्थी**—या अर्थाविषयीं

**अधिदैवत**—देवांनीं अधिष्ठित

**अधिभूत**—भूतांनीं अधिष्ठित

**अधिष्ठान**—आधार

**अध्यास**—खऱ्या वस्तूची खोट्याच्या ठायीं (भ्रांति.

**अध्वसंक्रमण**—मार्ग चालणें

**अनारिसें**—वेगळें

**अनावृत्त**—आवृत्त झालेलें नव्हे

**अनाहत**—शरीरस्थ एकचक्र

**अनिर्वचनीय**—वर्णन करण्यास अशक्य

**अपरोक्ष**—प्रत्यक्ष

**अपसिद्धांत**—सिद्धांतविरुद्ध

**अपाडाचा**—तुलना न होण्याजोगा

**अपार्नी**—गुदद्वारीं

**अप्रमेय**—निर्विषय

**अमूर्त**—निराकार

**अरिसें**—आरसे

**अरुष**—निरर्थक

**अलपावतां**—लघुत्वास येतां

**अवगाहन**—बुडणें, स्नान

**अवच्छिन्न**—व्यापून राहिलेला

**अवतरण**—प्रकटणें

**अवभासक**—प्रकाशक

**अवलंबन**—स्वीकारणें

**अव्याकृत**—कारणशरीर

**अवस्थात्रय**—जागृती, स्वप्न, सुषुप्ती

**असपद**—अक्षपद

**असुळविसुळ**—अव्यवस्थित

**असेस्वा**—अशेष, संपूर्ण

**अशेष**—सर्व

आ

**आगळें**—अधिक

**आगियाळी**—शरीरस्थ अग्निचक्र

**आतळे**—स्पर्श करी

**आथिली**—प्राप्त झाली

**आथिचिना**—असेचिना

**आदटे**—आदळे

**आनु**—भिन्न, निराळें

**आपजे**—उपजे, उत्पन्न होई

**आपाडें**—अतुल

**आपैसें**—आपोआप

आलंबें—आश्रयानें
आवर्त—भोंवरा
आसकें—सर्व
आक्षेप—संशय

ई

इडा—डावी नाकपुडी

उ

उकलणें—उमजणें
उगवू—उगम, उत्पत्ती
उटंके—वेगळें पडे
उड्डियानना—हृदयस्थान अ. अनाहतचक्र
उद्यत—प्रकट
उधारें—प्रकटें
उद्गार—शब्द
उन्मनी—पांचवी अवस्था
उन्मीलन—उघडण्याचा व्यापार
उन्मेष—ज्ञान

उपचारणें—निरोगी करणें
उपपत्ती—युक्ती
उपलवण—खोडी
उपार्जन—संपादन करणें
उफाडे—उडी घाली
उभवणी—उभारणी
उलथा—उलट अवस्था

ऋ

ऋषभ—मुख्य

ऐ

ऐणी—ब्रह्मप्राप्तीची इच्छा
ऐकजस्तू—ऐकणाराहो

ओ

ओडंबरु—कवटाळ, गारुड्याचा खेळ
ओसंडे—सांडलें जाय
ओळंघे—चढे

अं

अंगलग्न—अंगस्पर्श
अंतुरी—स्त्री

क

कडसणी—विचार
कडसीता—विचार करितां
कवळ—ग्रास, घांस
कातर—भितरा
काबाड—कडबा, गवत
काबरु—कावरं
काविरें—वेड अ. भ्रम
किमात्मक—कसें, कोणत्या प्रकारचें
कीजस—करिजेतें
कीर—खचित
कुरठा—मनाचा कपटी
कुवाड—कठीण
कुटी—आळ अ. आरोप

**कुसरी**—चतुरपणा

**कुंभक**—प्रणायामसमयीं पूरक होऊन जोंपर्यंत रेचक झाला नाहीं तोंपर्यंत जी प्राण—वायूची स्थिरता ती.

**कुंभस्थानीं**—गंडस्थळीं

**केतुल**—केवढा

**कैवल्यदानी**—मोक्ष देणारा

**कोड**—इच्छा

**कोडि**—कोटिसंख्या

**कोडें**—कूट

**कौतुक**—आश्चर्य

**कंचुक**—आंगरखा

**कांबी**—धनुष्य दंड

**क्लेदन**—ओलें करणें

## ख

**खंडज्ञान**—नाशवंत पदार्थांचें ज्ञान

## ग

**गतायाता**—जाणें येणें इ० व्यापार

**गदारोळ**—प्रारंभ

**गव्हार**—मूर्ख

**गळाला**—घोंट

**गीवसीत**—शोध करीत

**गुल्फा**—पायांचे घोटे

**गुंफा**—गुहा, एकांत स्थळ

**गोसावी**—स्वामी

**गोल्हाट**—देहांतील चक्रवि०

**गंडकी**—शालिग्राम शिला

## घ

**घन**—दाट

**घरौतें**—घरदार गोत्र

## च

**चतुर्विधवाचा**—परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी या चार

**चरमदशा**—सिद्धदशा

**चाड**—गरज

**चार्वाकसिद्धांत**—देह हाच आत्मा म्हण-णाऱ्यांचा सिद्धांत

**चाफेगोरटें**—चांफ्यांच्या फुलांप्रमाणें गोरें

**चेववावें**—जागें करावें

**चेववावा**—जागा करावा

**चेष्टे**—हाले

**चैतन्यीं**—ज्ञानामध्यें

**चंडानिलें**—कठीण वाऱ्यानें

## ज

**जघन्य**—अधम

**जनितें**—उत्पन्न झालेलें

**जनोलोक**—सूर्यलोकावरील लोक

**जलधर**—मेघ

**जहल्लक्षणा**—त्यागलक्षणा

**जहदजहल्लक्षणा**—त्यागात्यागलक्षणा

**जालंधर**—योगशास्त्रोक्त कंठस्थान
**जिणें**—वांचणें
**जिव्हाळा**—ओलावा
**जेतुलें**—जेवढें
**ज्योतिर्लोक**—सूर्यलोक

## झ

**झकविती**—फसविती
**झणें**—कदाचित सत्य
**झळाळा**—झळकण्याची स्थिती

## ट

**टकमकची**—एकसारखें टवकारून पहाणें

## ड

**डिंब**—प्रतिबिंब
**डोळवस**—डोळ्यांचा प्रकाश
**डंडळेना**—डगमगेना

## ढ

**ढिसाळें**—मोठें

## त

**तदात्मता**—तत्स्वरूपता
**तद्विवर्त**—परब्रह्माच्या ठायीं खोटा भास
**तत्वविद**—ब्रह्मनिष्ट
**तपोलोक**—सत्यलोकांतील पांचवा लोक
**तळवटीं**—खालीं
**तरंग**—पाण्यावरील लाट
**तन्वंगी**—कृशांगी
**तातवेळ**—तसदशा
**ताळी**—देहसत्पत्व
**तीनग्रंथी**—देहांतील स्थानवि.
**तुर्या**—चौथी समाधी अवस्था
**तूष्णीभूत**—उगाच राहणें
**तेतुलें**—तेवढें, तितकें
**तेउतेंचि**—तेवढें
**तेवेद्य**— तें जाणण्यास योग्य
**तेज्ञेय**—ते ज्ञानास योग्य

**तैजस**—स्वप्नावस्थेचा अभिमानी जीव
**तोज्ञाता**—तो ज्ञानसंपन्न
**तोवेत्ता**—तो जाणणारा
**तोंडपिटी**—बडबड
**त्वगिंद्रिय**—स्पर्शेंद्रिय
**त्राहाटक**—रेचकप्राणायामांतील भेद
**त्रिपुटी**—ध्येय, ध्याता, ध्यान या तिहींचा मेळ

## थ

**थितिया**—असलेल्या

## द

**दर्शन**—दिसल्या पदार्थांचें अवलोकन
**दळवाडें**—स्थूलरूप
**दानी**—देणारा
**देशवळा**—गांवठी
**दैनंदिन**—प्रतिदिनीं होणारें
**दृश्य**—दिसणारे पदार्थ
**दृष्टींत**—पाहण्यांत

**द्रष्टा**—दिसणाऱ्या पदार्थांचा जाणता

**द्विधा**—दोनप्रकारचा

## ध

**धवल**—पांढरा, शुभ्र

**धालेंपण**—तृप्ती

**ध्येयापरोक्ष**—ध्यानास योग्य जे अपरोक्ष वस्तु ते

## न

**नवटे**—नवाटे

**नव्हाळी**—नवेपणा

**नलाहे**—न मिळे

**नसंडे**—न सांडे न हरपे

**नवचे**—जात नाहीं

**नवहोता**—नवीन हवन करणारा

**नातळती**—न स्पर्शती

**नाथिला**—खोटा

**नामनिवर्चन**—नामसंकेत

**नादबिंदु**—कान, डोळे दाबल्यानें जो शब्द तरंग दिसतो तो

**नागवण**—दरवडा

**निमे**—लयास जाई

**निरुतें**—खरें

**निमेल**—नासेल

**निमेषोन्मेष**—पात्यास पातें लागेपर्यंतचा वेळ

**निकिया**—चांगल्या

**निरालंबी**—आश्रयरहित ब्रह्मस्वरूपी

**निपिजे**—नासिजे

**निधोट**—अखंड

**निरयलोक**—नरकलोक

**निखिल**—संपूर्ण

**निराभास**—भासरहित

**निकरा**—खडा

**निर्जित**—पराजित

**निकय**—जवळचा

**निरास**—टाकून देणें

**निरंजन**—गुप्त

**निरामय**—रोगरहित

**निर्वेच**—व्यय

**निर्वचना**—बोलणें

**नियम्य**—नियमन करणारा

**निदर्शन**—स्पष्टीकरण

**निर्वचे**—विचारानें

**निर्वाळलया**—शुद्ध चित्त झालेली

**नितनवें**—नित्य नवें

**नुमसे**—समजत नाहीं

**नेति**—नाहीं अशा प्रकारचें

**नेटेंबोटें**—हां हां ह्मणतां

**नेतिनेति**—नाहीं नाहीं अशा प्रकारानें

**न्यासितां**—ठेवितां

**न्याहाळीं**—पहा

## प

**पढिये**—आवडता
**पक्षिणी**—पक्ष्याची स्त्री
**पश्यंति**—चार वाणींतील एक वाचा
**परा**—वाचेंतील अतिसूक्ष्म वाचा
**परिच्छिन्न**—खंडित
**परोक्ष**—अप्रत्यक्ष
**पडप**—कोंदण
**पाडें**—बरोबरीनें
**पाडाचे**—योग्यतेचे
**पायू**—गुदेंद्रिय
**पासाव**—पासून
**पारुशलें**—लीन झालें
**पांचहीदर्शनें**—तंत्रोक्तपांचही मतें तीं
**येणेंप्रमाणें**—शैव, वैष्णव, गाणपत्य, सौर आणि शाक्त
**पांगितें**—स्वाधीन झालें
**पांगफिटे**—पराधीनपणा नाहींसा होय
**पिंगला**—उजवी नाकपुडी
**पूर्यष्टक**—नगरीचें अष्टक
**पूरक**—प्राणवायु वर ओढून घेणें
**पेलूनी**—सोडून
**प्रयोजी**—योग करी
**प्रपद**—पावलांचीं अग्रें
**प्रविविक्त**—गुप्त
**प्रसुप्तकुंडलिनी**—निजलेली सर्पीण
**प्रत्यगात्मा**—शरीरस्थ ब्रह्मचैतन्य
**प्रमेय**—विषय
**प्रदेश**—स्थान
**प्रदेशिरव**—देशपरिच्छेद
**प्रबुद्ध**—ज्ञानी
**प्रबोध**—ज्ञान
**प्राज्ञाचें**—सुषुप्तींतील अभिमानी जीवाचें

## फ

**फुडी**—खरोखरी
**फुलवणी**—प्रफुल्लितपणा
**फुज**—अभिमान

## ब

**बरव**—आदिष्ट
**बडिवारें**—मोठेपणानें
**बावुळी**—पाण्यावरील शेवाळ
**बाह्यउभवूनी**—बाहु उभे करून
**बागें**—आंगाकडे
**बांदवडी**—बंदिशाळा
**बीतला**—घडून आला
**बूझ**—समज
**बुझवर्म**—वर्म, समज
**बोद्धव्य**—जाणण्यास योग्य
**ब्रह्मविवर्त**—ब्रह्माचे ठायीं खोटा भास
**ब्रह्मविद**—ब्रह्म जाणणारा

ब्राह्मीमाया—परमेश्वराची माया

भ

भडस—उमाळा
भरोवरी—सामग्री
भाटी—उखरभूमी
भिरुड—कीड
भुररें—चेटक
भोज—टीलेनें

म

महंती—महत्व
महर्लोक—सप्तलोकांतील चवथा लोक
मध्यमा—तिसरी वाणी
मनोमेळें—एक विचारानें
महानुभाव—मोठा अनुभवी मनुष्य
माअग्नी—तर मग अग्नी
मांदुस—पेटी
मांदियाळें—समुदायांत
मुमुक्षु—मोक्षाची इच्छा करणारा
मुसावलें—एकत्र झालें
मेहु—मेघ
मेघुडे—मेघ
मोटकें—विचारानें
मंतव्य—मनन करण्यास योग्य

य

यथातथ्य—जसा आहे तसा
येरयेरां—परस्परां
येरां—इतरांस
येर—इतर, अन्य

र

रजस्तमीं—रजतमोगुणामध्यें
रक्तभूतिक—रक्तानें भरलेलें व भूतानें झालेलें
राणीव—राज्य
राउळें—स्वामीनें
रायेणाचें भातुकें—कडुवृंदावनाचें खाद्य
रेचक—प्राणायामांत प्राणवायु सोडणें
रेम्यकाहणी—भाकडकथा
रोकडें—प्रत्यक्ष
रोह—शरीरस्थस्थान
रार्पेण—राज्य

ल

लगसगा—त्वरा, घाई

व

वरोळें—वराडी
वाड—मोठें
वोखा—व्यर्थ
वायवसें—व्यर्थ
वाशिपे—भीति, भय
वाळी—आळ, आरोप
वाटिव—वांटा, भाग
वानवेलें—भाजलेलें बीज
विहिनु—रहित

विणावणी—उपाधी खटपट
विक्षेप—प्रतिबंध
विसंचलों—विस्कळित झालों
विक्षेपता—दृश्य, भास्य पदार्थांनीं चित्तास होणारा विक्षेप
विवर्त्त—भोंवरा
विकास—प्रफुल्लितपणा
विहरण—विहार, क्रीडा
विशद—स्पष्ट
विवर्धते—वाढणें, एक देहाची अवस्था
विकळ—कासावीस
विपरिणमते—तारुण्य आणि वार्धक्य यांचेमधील अवस्था
विघुळिते—नाश करून टाकिते
विसावुनी—विसांवा पावून
विमुच्यते—मुर्छा पावती, एक अवस्था
विवक्षा—बोलण्याची इच्छा

वितळें—घडून आलें
वेद्य—जाणण्यास योग्य
वेदक—जाणणारा
वळइत—कैवारी
वैरस्य—विरक्ती
वैशेषिक—न्यायशास्त्रांतील मताचें नांव
वैखरी—चौथी वाचा
वोजा—आतांच्या आता
वोस—ओसाड
वोळे—वळून येई
वोळंबा—कीड, मुंगी
वोखटा—वाईट, खट
वंचिती—ठकविती
व्यतिरिक्त—वांचून
व्याकुल—घाबरा झालेला

श

शलाका—काडी
शबल—मलीन, उपाधियुक्त
शक्तिचक्र—मायाचक्र
शब्दोन्मुख—शब्दासमोर
शिराणी—श्रेष्ठता
शेषपाठ—पद अथवा स्थान
शोच्यता—शोक करणें
श्वपचा—अंत्यजा
श्रीहट—शरिरांतील स्थान
श्रेणी—पगत

ष

षड्भाव—जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते, नश्यति इ० सहा
षड्धातु—मातेच्या तीन व पित्याच्या तीन मिळून सहा
षड्दर्शन—सहातंत्रोक्तमतें अथवा सहा शास्त्रांचा सिद्धांत

## स

**सळें**—सत्वर

**समावेश**—अंतर्भाव

**सप्तचक्रें**—मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर अनाहत, विशुद्ध, द्विदल व ब्रह्मरंध्र अशीं शरिरांतील चक्रें

**समष्टी**—ब्रह्मांड

**सविस्तृतें**—सविस्तर

**सर्जन**—उत्पत्ती

**समाधिसंप्रज्ञात**—सविकल्पसमाधि

**सलोकता**—मुक्तीचा भेद

**समीपता**—मुक्तीचा भेद

**सायुज्यता**—मुक्तीचा तिसरा भेद

**सानुरागा**—प्रीतियुक्त

**सामरस्य**—एकरूपता

**साक्षेपीं**—आक्षेप असतां

**साभास**—मनाला ज्याचा भास होतो तें

**सिनाळ**—भिन्नपणा

**सुखाडिक**—स्वस्थ बसणें

**सुलीनता**—वृत्तीची लीनदशा, नम्रपणा

**सुहावा**—शोभा

**सुभटा**—चांगला

**सुयें**—घाली

**सेवा**—शेवटीं

**सौरस्य**—सुरसपणा

**सौभरि**—उत्तम भरलेली

**संविती**—ज्ञान

**संभूती**—उत्पत्ती

**संसारणा**—उपजणें मरणें अशा अवस्था

**संसृती**—जन्ममरण

**संश्लिष्टता**—ब्रह्मस्वरूपाची गोडी लागणें अशी भूमिका

**संसरण**—संसार

**संस्कारण**—संस्कार करणें

**संसरती**—संसारांत पडती

**स्वसंवेद्य**—स्वयंप्रकाश

**सृजिला**—उत्पन्न केला

**सरूपता**—मुक्तीचा चौथा प्रकार

## ह

**हळुवट**—हळुव, उणा

**हारंबळे**—दुःखानें ओरडे

**हिरण्यगर्भाचें**—ब्रह्मांडांतील सूक्ष्मदेहाचें

**हिंपुटी**—लघुत्व

**हेळा**—क्षणमात्र

## क्ष

**क्षपणक**—नास्तिकमताचा पुरुष

## ज्ञ

**ज्ञप्ति**—ज्ञान

**ज्ञापक**—जाणविणारा

**ज्ञेय**—जाणण्यास योग्य

समाप्त.

# विवेकसिंधूंतील प्रकरणें व विषय यांची अनुक्रमणिका.



मुद्रक—प्रभाशंकर जयशंकर पाठक, धी जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गिरगांव गायवाडी घर नं. ९, मुंबई नं. ४.

प्रकाशक—पंढरिनाथ विनायक पाठक, गिरगांव गायवाडी घर नं. ९, मुंबई नं. ४.

आवृत्ति २ री. ] सन १९२८ [ प्रति २०००.

# चातुर्मासांत वाचण्यालायक ग्रंथ.

| ग्रंथांचीं नांवें. | रु. आ. |
|---|---|
| श्रीमद्भागवत सार्थ ... ... | ३५—० |
| भावार्थ रामायण ... ... | १२—० |
| ,, बुकसाईज ... ... | ८—० |
| एकनाथी भागवत ... ... | ६—० |
| ,, बुकसाईज ... ... | ६—० |
| रामविजय मोठा ... ... | ५—० |
| ,, लहान ... ... ... | २—० |
| हरिविजय मोठा ... ... | ४—० |
| ,, लहान ... ... ... | २—० |
| पांडवप्रताप मोठा ... ... | ६—० |
| ,, लहान ... ... ... | ३—८ |
| [illegible]किविजय मोठा ... ... | ६—० |
| ,, लहान ... ... ... | ३—० |
| [illegible]नाथ मोठा ... ... ... | ४—० |
| ,, लहान ... ... ... | २—० |
| सिद्धांतबोध ... ... ... | ५—० |
| [illegible]सबोध ... ... ... | १—८ |

| ग्रंथांचीं नांवें. | रु. आ. |
|---|---|
| दासबोध सार्थ ... ... ... | ४—० |
| ,, बुकसाईज ... ... | १—८ |
| गुरुचरित्र पोथी ... ... | २—० |
| ,, रेशमी बुकसाईज ... | २—८ |
| ,, ,, लहान ... ... | १—० |
| नासिकेत ... ... ... ... | १४—० |
| तुकारामचरित्र ... ... ... | १—४ |
| मूळस्तंभ ... ... ... ... | १—० |
| शिवलीलामृत पोथी ... ... | ०—१२ |
| ,, ग्लेझ ... | १—४ |
| ,, बुकसाईज रेशमी | १—० |
| ,, कापडी ... | ०—८ |
| ज्ञानेश्वरी ... ... ... | १—८ |
| ,, साखरेकृत ... ... | ६—० |
| रुक्मिणी स्वयंवर ... ... | १—० |
| सार्थ कार्तिकमाहात्म्य ... ... | १—० |
| ,, वैशाखमाहात्म्य ... ... | १—० |

संस्कृत मूळ श्लोक असून मराठींत

| आर्थांतर केलेल्या पोथ्या. | रु. आ. |
|---|---|
| सार्थ सत्यनारायण ... ... | ०—४ |
| ,, वटसावित्री ... ... | ०—३ |
| ,, वामनद्वादशी ... ... | ०—३ |
| ,, हरितालिका ... ... | ०—२ |
| ,, ऋषिपंचमी ... ... | ०—२ |
| ,, गणेशचतुर्थी ... ... | ०—३ |
| ,, अनंतचतुर्दशी ... ... | ०—३ |
| ,, सोमवती ... ... ... | ०—३ |
| ,, पिठोरी ... ... ... | ०—३ |
| ,, महालक्ष्मी ... ... ... | ०—२ |
| ,, जन्माष्टमी ... ... ... | ०—४ |
| ,, सिद्धिविनायक ... ... | ०—५ |
| ,, सत्य विनायक ... ... | ०—६ |
| ,, संकष्ट चतुर्थी ... ... | ०—४ |
| व्यंकटेश विजय ... ... | १—८ |

याशिवाय टपाल खर्च निराळा.

